# अध्यात्मग्रंथमाला

" तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगचि अधिकारिये ।
परि लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ "

ज्ञानेश्वरी १८.१७५०



ग्रंथांक ४

# रामदासवचनामृत



रा. द. रानडे, एम्. ए.



किंमत १॥ रुपया.

## पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें

१ Academy of Philosophy and Religion, Post Deccan Gymkhana, Poona.

२ अध्यात्मविद्यापीठ, पोष्ट निंबाळ, जिल्हा विजापूर.

३ आर्यभूषण प्रेस, पुणें.

४ गणेश प्रिंटिंग वर्क्स, शनिवार पेठ, पुणें.

५ सर्व बुकसेलर्स, पुणे, मुंबई, नागपूर वगैरे.



हें पुस्तक रा. अनंत विनायक पटवर्धन यांनीं
आर्यभूषण छापखाना, पुणें, येथें छापिलें.
व तें प्रो. रामचंद्र दत्तात्रेय रानडे यांनीं
पुणें येथें प्रसिद्ध केलें.

# अध्यात्मग्रंथमाला

१. या ग्रंथमालेचें मुख्य प्रयोजन म्हणजे लोकांस परमार्थाचें उज्ज्वल स्वरूप महाराष्ट्रवाङ्मयांतून उघड करून सांगणें हें होय. ज्ञानेश्वरांपासून रामदासांपर्यंत जे साधु महाराष्ट्रांत निर्माण झाले त्यांनीं अशा प्रकारची उज्ज्वल ग्रंथरचना मराठींत करून ठेविली आहे कीं तिचें वाङ्मयदृष्ट्या व परमार्थदृष्ट्या फारच मोठें महत्त्व आहे. परमार्थाबद्दलच्या निरनिराळ्या भ्रामक कल्पनांचें निरसन करून शुद्ध परमार्थाचें स्वरूप समजावून देणें हें महाराष्ट्रवाङ्मयाचें पवित्र कर्तव्य आहे. हें कार्य महाराष्ट्रवाङ्मयांतून जितक्या उत्कृष्ट रीतीनें सिद्धीस गेलें आहे तितकें हिंदुस्थानच्या इतर प्रांतिक भाषांतून, अगर पाली अगर प्राकृत भाषांतून, अगर खुद्द संस्कृतभाषेंतूनही सिद्धीस गेलें आहे किंवा नाहीं याची शंकाच आहे. नुसतें परमार्थाचें खरें स्वरूप समजून देण्याचें सामर्थ्य महाराष्ट्रवाङ्मयांत आहे इतकेंच नव्हे, तर सर्व धर्मांचें एकीकरण करण्याचें सामर्थ्यही महाराष्ट्रवाङ्मयांत आहे. धर्माधर्मांतील लढे केवळ अज्ञानामुळें उत्पन्न होतात; पण परमार्थाचें शुद्ध स्वरूप कळल्यास ते लढे नाहींसे करण्याचें सामर्थ्य त्यांत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. यामुळें आमच्या महाराष्ट्राच्या धार्मिक वाङ्मयाचा सशास्त्र अभ्यास होणें किती जरूरीचें आहे हें सांगण्याचें कारण नाहीं.

२. आज या अध्यात्मग्रंथमालेंतील पहिलीं चारच पुस्तकें प्रसिद्ध होत आहेत. हीं चार पुस्तकें म्हटलीं म्हणजे महाराष्ट्राच्या धार्मिक वाङ्मयाचा संपूर्ण निष्कर्ष होय. पहिल्या पुस्तकांत ज्ञानेश्वरींतील उताऱ्यांची विषयवार रचना करून ज्ञानेश्वरांची सर्वांगीण पारमार्थिक शिकवण कशी होती हें संपूर्ण रीतीनें त्यांच्याच शब्दांत सांगण्याचा प्रयत्न केला आहे. दुसऱ्या पुस्तकांत तीन भाग आहेत.

पहिल्या भागांत निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, व चांगदेव यांनीं जी अभंगरचना केली आहे तिचा संपूर्ण गोषवारा त्यांच्याच शब्दांत दिला आहे. दुसऱ्या भागांत नामदेव व तत्कालीन संतकवि यांच्या निवडक अभंगांची विषयवार रचना करून परमार्थाचें रहस्य त्यांच्या तोंडून सांगितलें आहे. या संतकवींमध्यें ज्यांचे ज्यांचे अभंग उपलब्ध आहेत अशा सर्व संतांचा उल्लेख करण्याचा प्रयत्न केला आहे. गोरा कुंभार, विसोबा खेचर, सांवता माळी, नरहरि सोनार, चोखा-मेळा, जनाबाई, सेनान्हावी, कान्होपात्रा, या सर्व जातींच्या व व्यव-सायांच्या संतांचा उल्लेख येथें केला आहे. तिसऱ्या भागांत भानु-दास, जनार्दनस्वामी, व एकनाथ यांच्या अभंगांची विषयवार निवड करून त्यांच्या तोंडून परमार्थाचें रहस्य सांगितलें आहे. अध्यात्म-ग्रंथमालेच्या तिसऱ्या पुस्तकांत संतशिरोमणि तुकारामांचें अध्यात्म-चरित्र व अध्यात्मोपदेश त्यांच्याच वचनांच्या आधारें सांगितला आहे. शेवटच्या म्हणजे चवथ्या पुस्तकांत रामदासांच्या दासबोध व इतर संकीर्ण ग्रंथांच्या आधारें रामदासांची पारमार्थिक व व्याव-हारिक शिकवण कशी होती हें सांगितलें आहे. यावरून ही गोष्ट उघड होईल कीं, हीं चार पुस्तकें म्हणजे महाराष्ट्रधर्माचा मूलरूपानें संपूर्ण इतिहासच होय. या चारी पुस्तकांस विस्तृत विवेचनात्मक प्रस्तावना जोडल्या असून त्यांमध्यें त्या त्या साधूंचें पारमार्थिक वर्म शक्य तितकें उघड करून सांगण्याचा प्रयत्न केला आहे. यामुळें या चारी पुस्तकांचा अभ्यास केल्यास महाराष्ट्रवाङ्मयामध्यें परमार्थाचें रहस्य निरनिराळ्या संतांनीं कसें सांगितलें आहे हें पूर्णपणें निदर्शनास येईल. ज्ञान, भक्ति, व कर्म यांचा त्रिवेणीसंगम जर कोठें झाला असेल तर तो आमच्या महाराष्ट्रवाङ्मयांतच होय. ज्ञानेश्वरांप्रमाणें ज्ञानी, नामदेवतुकारामांप्रमाणें भक्तिमान्, व रामदासांप्रमाणें कर्मयोगी लोक आमच्या महाराष्ट्रांतच निर्माण झाले. आजचा आपला प्रसंग

ज्ञान, भक्ति, व कर्म यांचा समुच्चय करण्याचा आहे. यामुळेंही या ग्रंथमालेच्या अभ्यासाचें किती महत्त्व आहे हें सांगावयास नको.

३. आजकाल आपल्या विश्वविद्यालयांतून महाराष्ट्रभाषेचें अध्ययन जारीनें सुरू होत आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे. जें स्थान इंग्रजी भाषेमध्यें चॉसर्, शेक्सपियर्, मिल्टन्, वर्ड्सवर्थ् इत्यादिकांनीं पटकावलें आहे, तेंच स्थान वाङ्मयदृष्टीनें ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, व रामदास यांनीं महाराष्ट्रभाषेंत पटकावलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. बायबलचा ज्याप्रमाणें वाङ्मयाच्या दृष्टीनें अभ्यास होतो, त्याप्रमाणेच आमच्या साधूंच्या ग्रंथांचा वाङ्मयाच्या दृष्टीनेंही अभ्यास व्हावयास पाहिजे. रवींद्रनाथ टागोर यांचा गीतांजलि हा ग्रंथ उत्कृष्ट आहे यांत शंका नाहीं; परंतु तुकारामज्ञानेश्वरांचें अध्ययन केलें असतां त्यांचे ग्रंथ तितकेच किंवा त्याहूनही सरस आहेत हें वाचकांच्या ध्यानांत येईल. किंबहुना, तुकारामज्ञानेश्वरादिकांच्या अगर तत्सदृश साधूंच्या वचनांचा फैलाव जो हिंदुस्थानांत झाला त्याचें गीतांजलि हें एक आधुनिक निदर्शन आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या कारणास्तव महाराष्ट्रवाङ्मयाच्या व महाराष्ट्रधर्माच्या आधारभूत असलेल्या या ग्रंथांचा अभ्यास आमच्या विश्वविद्यालयांतून अवश्य व्हावयास पाहिजे. चमत्कारांच्या दृष्टीनें या साधूंच्या चरित्रांकडे न पाहतां त्यांच्या ग्रंथोक्तींच्या दृष्टीनें त्यांजकडे पहावयास आपण शिकलें पाहिजे; व अशा रीतीनें त्यांजकडे पाहिलें असतां बुद्धिवादास पटेल अशाच प्रकारचा अनुभव ( Rational Mysticism ) त्यांच्या ग्रंथांत सांगितला आहे असें दिसून येईल.

४. "अध्यात्मविद्यापीठ"(Academy of Philosophy and Religion ) या संस्थेतर्फे हिंदी तत्त्वज्ञानाचा इतिहास जो सोळा भागांत लिहिण्यांत यावयाचा आहे, त्यांतील पंधराव्या भागांत हीं

आजचीं चारही पुस्तकें अंतर्भूत होतात. या चार मूळ पुस्तकांवर विवरणात्मक " Mysticism in Maharashtra " या नांवाचा ग्रंथ हा ह्या हिंदीतत्त्वज्ञानाच्या इतिहासांतील दहावा भाग होय; व तो लौकरच छापून बाहेरही निघेल. या ग्रंथाचें अध्ययन व वाचन विशेषतः युरोपांत अधिक होणार. त्यांत जीं प्रमेयें केलीं आहेत त्यांस आधारभूत अगर उपकरणभूत म्हणून हे आजचे चार ग्रंथ प्रकाशित होत आहेत, ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. या कारणामुळेंच या चार पुस्तकांतील कांहीं पुस्तकांच्या शेवटीं इंग्रजी हेडिंगें घातलीं आहेत, त्यांचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे पाश्चात्य लोकांनीं आमच्या महाराष्ट्रभाषेचा अभ्यास करून त्यांतील चिद्रत्नें ओळखण्यास शिकलें पाहिजे हा होय.

५ या अध्यात्मग्रंथमालेंतील पुढील पुस्तकें जसजशीं तयार होतील तसतशीं तीं प्रसिद्ध करण्यांत येतील. आज त्यांचा नामनिर्देश करण्याचें कारण नाहीं. तूर्त आजचे चारच ग्रंथ प्रकाशित होत आहेत. पुढें मागें जुळून आल्यास, पाश्चात्य व पौर्वात्य तत्त्वज्ञांचे व सत्पुरुषांचे विचार व अनुभव जमेस धरून, शास्त्रीय दृष्टीचा निकष लावून, स्वानुभवास पडताळून, चिकित्सक बुद्धीनें आधुनिक लोकांस परमार्थाच्या दृष्टीनें उपयोगी पडेल अशा प्रकारचा एक ग्रंथ लिहिण्याची जरूरी आहे; त्यास हे आजचे चारही ग्रंथ उपयोगी पडतील असा भरवसा आहे.

रा. द. रानडे.

# प्रस्तावना.

१. श्रीसमर्थ रामदास याच्या चरित्रासंबधानें खात्रीलायक पुरावा पाहिजे असल्यास तो "वाकेंनिशीप्रकरण" या नावाच्या प्रकरणांत सापडेल. रामदासाचा काल माघ वद्य ९ शके १६०३ या रोजीं झाला. यानंतर चारच दिवसानीं म्हणजे माघ वद्य त्रयोदशीस रामदासाचे पट्टशिष्य दिवाकर गोसावी यानी सांगितल्यावरून रा. अंताजी गोपाळ वाकनीस यांनी रामदासाच्या चरित्राचें टिपण करून ठेविलें आहे. इतिहाससंशोधक रा. राजवाडे हे काही वर्षांपूर्वी चाफळास गेले असता त्यास हे " वाकेंनिशीप्रकरण " तेथील एका दप्तरात उपलब्ध झालें. रामदासाचा मुख्य मठ चाफळास असल्यानें तेथें उपलब्ध झालेल्या या वाकेंनिशी प्रकरणाचें महत्त्व किती आहे हे सांगणे नकोच. हनुमत स्वामीनीं जी रामदासाची बखर लिहिली ती प्रथम शके १७१५ त लिहून नंतर शके १७३९ मध्यें त्यानी वाढवून ती पुनः लिहिली. रामदासस्वामींच्या निधनानंतर सरासरी शंभर वर्षांनी लिहिलेल्या या बखरीपेक्षा रा. अंताजी गोपाळ वाकनीस यांनी जें रामदासस्वामीच्या निधनानंतर चारच दिवसानीं " वाकेंनिशीप्रकरण " लिहिलें आहे त्याची किंमत फारच आहे हे सांगणें नको. या प्रकरणात ज्या काही अद्भुत चमत्काराच्या गोष्टी सांगितल्या आहेत त्या सोडून दिल्या, तरी त्याच्या मुळाशी बरेंच ऐतिहासिक सत्य आहे हे वरवर पहाणाऱ्यासमुद्धा दिसून येईल; व हे सत्य काय आहे याचा आपण आता विचार करू.

२. शके १५३० चैत्र शुद्ध ९ रामनवमीचे दिवशी रामदासाचा जन्म झाला.
शके १५३७ रामदासांच्या वडिलाचे निधन

शके १५४२ रामदास जांबगावाहून टाकळीस पळून गेले. याबद्दल दोन गोष्टी उपलब्ध आहेत. एक, रामदासाच्या आईनें अत्याग्रह केल्यावरून आपल्या भाचीशी लग्न करण्याचे कबूल करून रामदास ' सुमुहूर्ते सावधान ' म्हटल्याबरोबर मंडपातून पळून गेले. दुसरी गोष्ट अशी आहे की, रामदासाचे ज्येष्ठ बंधु गंगाधरपंत यांजवळ रामदासांनी मंत्र मागितला असतां त्यानी तो देण्याचें नाकारलें, म्हणून ईश्वराच्या शोधार्थ रामदास नाशिकजवळ टाकळी येथे गेले.

शके १५४२–५४ रामदासाचें टांकली येथें नदीवर मध्यान्हापर्यंत गायत्री पुरश्चरण, व मध्यान्हानंतर रामजपयज्ञ. रामदासांस श्रीरामचंद्राचा साक्षात्कार.

शके १५५४–६६ पुरश्चरण सपल्यावर रामदासांनी केलेल्या तीर्थयात्रा. रामदासांनी या अवधीत ज्या तीर्थयात्रा केल्या व जे देश पाहिले त्यांचें वर्णन त्यांनींच थोडेंबहुत "तीर्थावळी" या प्रकरणांत करून ठेविलें आहे (विविध विषय, खंड २, पहा.)

शके १५६६ ईश्वरी संकेतानुसार रामदास कृष्णातटाकीं येऊन हाच देश आपला सांप्रदाय वाढविण्यास योग्य आहे असें समजून तेथें राहिले.

शके १५६९ या साली अगापुरच्या डोहांतून रामाची मूर्ति रामदासांस मिळाली.

शके १५७० या मूर्तीची स्थापना त्यांनी चाफळ येथे कृष्णातटाकीं आल्यावर चार वर्षांनी केली. ती मूर्ति अद्यापिही पहावयास सांपडते.

शके १५७१ वाकेनिशी प्रकरणाप्रमाणे या साली रामदासांनी शिवाजीस चाफळनजीक शिंगणवाडी येथील बागेंत वैशाख शुद्ध ९ गुरुवार या रोजी अनुग्रह दिला. याबद्दल भिन्न मतही आहे, त्याचा पुढें निर्देश करण्यांत येईल.

शके १५७१ आषाढमासी रामदास पंढरपुरास विठोबाच्या दर्शनार्थ गेले. त्यावेळेसच त्यांनी विठ्ठल व राम याबद्दलचें आपलें सुंदर पद केलें असेल (क्रमांक १३१). तुकाराम व रामदासांची तुकारामांच्या निधनापूर्वी भेट झाली होती अशी जी दंतकथा आहे तिचा प्रसंग कदाचित् रामदासांची ही पंढरपुरची यात्राच असेल. तुकाराम शके १५७२ फाल्गुनांत समाधिस्थ झाले. तेव्हां त्यांची व रामदासाची भेट होणें अशक्य दिसत नाही.

शके १५७२ वाकेनिशी प्रकरणाप्रमाणे या साली रामदास परळीस रहावयास गेले. इतर मताप्रमाणें शिवाजीस राज्याभिषेक झाल्यावर रामदास सज्जनगडावर रहावयास गेले.

शके १५७७ या साली शिवाजीनें आपलें राज्य समर्थांच्या झोळींत टाकिलें.

शके १५७७ समर्थ जांबेस आपल्या मातोश्रीचें निधनप्रसंगीं अचानक गेले, व त्यांस मातोश्रींचें शेवटचें दर्शन झालें.

शके १५९६ मध्यें शिवाजीस राज्याभिषेक झाला. राज्याभिषेक झाल्यावर शिवाजी दीड महिनापर्यंत सज्जनगडास येऊन राहिला, व त्यानें तेथें बरीच रक्कम अन्नसंतर्पण, परमार्थकार्य, वगैरेंत खर्च केली.

शके १५९६ याच साली हिंवाळ्यांत समर्थ कोंकाणांमध्यें हेळवाकच्या घळींत होते. तेथें त्यांस कफाचा व तापाचा बराच विकार झाला. हेळवाकास रघुनाथभट यांनीं समर्थांस बराच उपचार केला. रामदास चाफळाच्या उष्ण हवेंत आल्यावर त्यांनीं रघुनाथभट यांस स्वदस्तुरचें लिहिलेलें पत्र उपलब्ध आहे (क्र. १०९). त्याचा उल्लेख पुढें येईलच.

शके १५९९ मध्यें रामीरामदासांचा देहांत झाला.

शके १६०० त रामदासांनी राम, लक्ष्मण, व सीता यांच्या मूर्ती तंजावर मध्यें करावयास घातल्या.

शके १६०० आश्विन शुद्ध १० स म्हणजे दसऱ्याच्या दिवशी शिवाजीने रामदासांस करून दिलेली सनद अद्याप चालू आहे. ती पुढें दिलेलीच आहे. (क्र. ११५).

शके १६०० रामदासांनी कल्याणांस डोमगावीं मठ करून राहण्यास सांगितलें.

शके १६०१ पोष महिन्यांत शिवाजी महाराज रामदासांच्या भेटीस आले. ही भेट शेवटचीच होय असें रामदासानी शिवाजीस सुचविलें. यानंतर शिवाजी महाराज फार दिवस राहिले नाहीत.

शके १६०२ चैत्रमासी शिवाजीचा अंत झाला, व संभाजी आपला अमात्य रामचंद्रपत यांस घेऊन ज्येष्ठमासी रामदासांच्या दर्शनास आला, व तेथें आठ दिवस राहिला.

शके १६०३ माघ शुद्ध १ स तंजावरहून मूर्ति आल्या. माघ वद्य ५ समर्थांनी त्यांची स्थापना सज्जनगड येथें केली. हल्ली रामदासांच्या समाधीवर सज्जनगड येथें ज्या मूर्ति दिसतात त्या याच होत.

शके १६०३ माघ वद्य नवमी रोजीं समर्थांनीं देह ठेविला.

३. वरील शकावलींत एका महत्त्वाच्या मुद्यासंबधानें विद्वान् लोकांमध्यें वाद माजून राहिला आहे; तो मुद्दा म्हटला म्हणजे रामदासांनीं शिवाजीस अनुग्रह केव्हां दिला यासंबंधीं होय. आजपर्यंत प्रचलित असलेल्या मतांप्रमाणें वाकेनिशी-

प्रकरणांत दिल्याप्रमाणें रामदासांनी शिवाजीस शके १५७१ या साली अनुग्रह दिला. हें मत वाकेनिशीप्रकरण व हनुमंत स्वामीची बखर याच्या बरहुकूम असून रा. देव व राजवाडे यांस तें अभिप्रेत आहे. याच्या विरुद्ध मताचें प्रतिपादन प्रो. भाटे व चांदोरकर यांनी केलें आहे. या मताप्रमाणें शिवाजीस रामदासांनी शके १५९४ मध्ये अनुग्रह दिला. या दोन मतांमध्ये दक्षिण व उत्तर ध्रुव यांइतकें अंतर आहे हें उघडच दिसत आहे. रा. देव व राजवाडे यांचे मत खरें असल्यास शिवाजीच्या कारकीर्दीच्या अव्वलपासूनच रामदासांचें शिवाजीवर पारमार्थिक वर्चस्व असल्यानें शिवाजीचा राज्यविस्तार बहुशः रामदासाच्या नेतृत्वाखाली झाला असला पाहिजे. याच्या उलट रा. भाटे व चांदोरकर यांचें मत खरें असल्यास रामदासांचें शिवाजीवर वर्चस्व शिवाजीच्या कारकीर्दीच्या अखेरीसच प्रस्थापित झालें असल्यानें शिवाजीस रामदासांपासून राज्यस्थापनेची स्फूर्ति मिळाली हें म्हणणें फोल होतें. ही मतें इतकी परस्परविरोधी आहेत की त्यातून मार्ग काढणें कठीण आहे. शिवाय दोहींकडे कागदपत्रांचा पुरावा असल्याने दोन्ही मतें जणूं काय अभेद्यच आहेत अशी वाटतात. तथापि तारतम्यबुद्धीनें यांतील कोणतें ग्राह्य आहे याचा आपण थोडक्यांत येथे विचार करूं.

४. भाटे व चांदोरकर यांच्या मताप्रमाणें ( १ ) केशव गोसावी यांनी दिवाकर गोसावी यांस शके १५९४ मध्यें जें पत्र लिहिलें आहे त्यात 'राजे यांची पहिलीच भेट आहे. वाडीचे लोकास खटपटेस अणावे...झाडी बहुत आहे' असा उल्लेख आहे. तसेंच ( २ ) शके १५८० मध्यें भास्कर गोसावी यांनी दिवाकर गोसावी यांस जें पत्र लिहिले आहे त्यांत त्यांनी 'शिवाजी राजे यांच्याकडे भिक्षेस गेलो... आम्हीं बोललो की आम्ही रामदासी. श्रीसमर्थाचे शिष्य चाफळास हों. मग ते बोलले की ते कोठे राहतात व मुळ गांव कोण ?' असा उल्लेख आहे. ( ३ ) याशिवाय ज्यांवर तारीख नाही अशी दिवाकर गोसावी यांची दोन पत्रें उपलब्ध आहेत. त्यांच्या ताजाकलमांत शिवाजीस शिंगणवाडी येथें परिधावी संवत्सरी परमार्थ झाला असा अनंत गोसावी व चिमा अक्का यांचा अनुक्रमें उल्लेख आहे. या मताप्रमाणें पाहिलें असतां रामदासांची व शिवाजीची भेट शके १५९४ मध्यें झाली, शके १५८० पर्यंत रामदास कोण होते हें शिवाजीस माहीतही नव्हतें, व परिधावी संवत्सर शके १५९४ मध्यें पडत अस-

त्यानें आजपर्यंत शके १५७१ मध्यें रामदासांनी शिवाजीस अनुग्रह दिला असें जें मत प्रचलित आहे तें खोटें ठरतें.

५. याच्या विरुद्ध रा. देव व राजवाडे याचे म्हणणें असें आहे की ज्या पत्रांवर रा. भाटे व चांदोरकर यांची भिस्त आहे ती पत्रें अस्सल नसून नक्कल आहेत. व शिवाय त्यांत जे शक लिहिले आहेत ते स्पष्ट नाहीत, अगर त्यांत हस्तदोष आहे. शिवाय ती पत्रें अस्सल आहेत असें जरी धरून चाललें तरी त्या पत्राचा अर्थ दुसऱ्या रीतीने लावता येण्यासारखा आहे. (१) पहिल्या पत्रात शिवाजी राजे याची पहिलीच भेट आहे असा जो उल्लेख आहे तो रामदासांच्या भेटीविषयी नसून शिवाजीने चाफळ येथील मठास शके १५९४ मध्यें जी भेट दिली तीस अनुलक्षून आहे. रा. दत्तोपंत आपटे यानी ही सूचना पुढें माडली आहे. या सूचनेस दुजोरा म्हणून वरील पत्र लिहिल्यावर चारच महिन्यांनी शिवाजी राजे यांनी दत्ताजीपंत वाकेनिवीस यांस जें पत्र लिहिलें आहे त्यांत ' चाफल येथें रामदास गोसावी आहेत. श्रीचें देवालय केले आहे...तथ कटकीचे सिपाही लोक व बाजे लोक राहताती...चोरा चिरटियाही उपद्रव होउ न दणें ' असा जो उल्लेख आहे तो शिवाजी राजे यानी चाफळमठास शके १५९४ सालीं भेट दिली त्यानंतरचा आहे. ( २ ) रा. भाटे व चांदोरकर यांच्या दुसऱ्या मुद्यांत भास्कर गोसावी यांशी बोलतांना शिवाजी राजे यांनी हे रामदासाचेच खरे शिष्य आहेत किंवा नाहीत याची परीक्षा पाहण्याकरितांच त्यांस प्रश्न केला असावा असें रा. देव व राजवाडे यांचें म्हणणें आहे. ( ३ ) रा. भाटे व चांदोरकर यांच्या तिसऱ्या मुद्यांत दिवाकर गोसावी यांची जीं दोन पत्रें उद्धृत केली आहेत त्यांत परिधावी संवत्सरी परमार्थाचा उल्लेख मुळामध्यें केला गेला नसून त्यांच्या ताजाकलमांत केला आहे, म्हणून तो मुळाइतका विश्वसनीय नाहीं. शिवाय, जरी शके १५७१ मध्यें प्रथम रामदासाचा शिवाजीस अनुग्रह झाला असला, तथापि त्याची पुनरावृत्ति शके १५९४ मध्यें झाली असण्याचा संभव आहे.

६. याशिवाय प्रो. भाटे व चांदोरकर यांच्या मताविरुद्ध दोन तीन कारणें आहेत त्यांचाही येथें उल्लेख केला पाहिजे. ( ४ ) रामदास शिवाजीचे केवळ " मोक्षगुरु किंवा धर्मगुरु ' होते व त्यांचें मूळपासून राजकारणाकडे लक्ष नव्हतें

असें म्हणून चालावयाचें नाहीं. आम्ही उद्धृत केलेल्या दासबोधांतील ज्यांत तुळजाभवानीचा उल्लेख आहे अशा पहिल्या उताऱ्यावरून, शिवाय रामदासांनीं तुळजादेवीस " तुझा तूं वाढवी राजा । सीघ्र आम्हांचि देखतां " ( क्र. ११२ , या उताऱ्यावरून, व शिवाय आनंदवनभुवन ( क्र. ११६ ) या सर्व उताऱ्यांवरून रामदासांचें राजकारणाकडे मूळपासून लक्ष नव्हते असें म्हणणें चुकीचें होईल. शिवाय शके १५८३ मध्यें प्रतापगडावर तुळजाभवानीची स्थापना रामदास यांच्याकडूनच झाली असल्याबद्दलचा पुरावाही आहे ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. ( ५ ) संभाजी यानें रामदासांचे शिष्य वासुदेवगोसावी यांस शके १६०२ मध्यें जी सनद दिली आहे त्यांत चंद्र पचवीस, जिल्हेज, सन इहिदे सबइन अलफ म्हणजे शके १५९३ मध्यें शिवाजीनें वासुदेव गोसावी यांस दिलेल्या सनदेचा उल्लेख केला आहे. हा शक शके १५९४ च्या पूर्वीचा असल्यानें रामदासांस मात्र शिवाजी शके १५९४ पर्यंत ओळखीत नाहीत व त्यांचे शिष्य वासुदेवगोसावी यांस शके १५९३ मध्यें सनद देण्याइतकें ओळखितात ही मोठ्या चमत्काराची गोष्ट आहे असें रा. देव यांनी म्हटलें आहे. ( ६ ) परंतु आमच्या मतें आतांपर्यंत उपलब्ध असलेल्या पुराव्यांत शके १६०० आश्विन शुद्ध १० या रोजी शिवाजीनें रामदासांस जी सनद करून दिली आहे ( क्र. ११५ ) ती सनदच सर्वांत श्रेष्ठ आहे असें म्हणण्यास हरकत नाही. या सनदेंत रामदासांनी चाफळास श्रीची स्थापना केल्यापासून म्हणजे शके १५७० पासूनच आपल्या व रामदासांच्या संबंधाचा जो साद्यंत वृत्तांत शिवाजीनें लिहिला आहे त्यावरून रामदासांची व शिवाजीची भेट शके १५९४ मध्यें झाली या मतास गौणत्व येतें. (१) चाफळची स्थापना, (२) राजकारण व धर्मस्थापनेचा उपदेश, (३) संपादिलेल्या राज्याचें रामदासचरणीं समर्पण, (४) राजकारणाचा पुनः उपदेश, (५) साम्राज्यप्राप्तीनंतर चाफळास इनाम, या सर्व गोष्टींचा उलगडा रामदासांचा शिवाजीशीं शके १५९४ च्या अगोदर बरींच वर्षे संबंध आला असला पाहिजे असें मानल्यावांचून सुसंगत रीतीनें होत नाहीं. तथापि आणखी कांहीं ऐतिहासिक पुरावा बाहेर आल्यावर याबद्दल यापेक्षां अधिक निश्चित रीतीनें लिहितां येईल.

७. रामदासांच्या ग्रंथांपैकीं दासबोध हा भक्तिग्रंथराज आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. रामदासांच्या वेळेसच या ग्रंथाच्या तीन वाढविलेल्या आवृत्त्या

निघाल्या असाव्या असें वाटतें. दासबोध ग्रंथाची मूळ कल्पना ‘ एकवीस समासी ’ अगर ‘ जुना दासबोध ’ या नावानें जो ग्रंथ प्रसिद्ध आहे त्यांत आहे. या जुन्या दासबोधांत व हल्लींच्या आपल्या दासबोधांत पुष्कळ प्रकरणें सारखींच आहेत. त्यांचा जिज्ञासूंनीं अवश्य अभ्यास करावा. यानंतर सत्तर समासांमध्यें दासबोध वाढविण्याची कल्पना रामदासांस सुचली असावी, व त्याबरहुकूम हल्लींच्या दासबोधाचे पहिले सात दशक लिहिले गेले असावे. दासबोधांतील दशक ७ समास १० यांतील ४२ वी ओंवी “ सरली शब्दाची खटपट । आला ग्रथाचा शेवट । येथें सांगितलें पष्ट सद्गुरुभजन ॥ ” या व पुढील ओंव्यांवरून प्रथम दासबोधाची समाप्ति येथेंच करण्याचा रामदासांचा विचार असावा असें दिसतें. नंतर प्रसंगानुरूप वाढत वाढत जाऊन इतर समासांची त्यांत भर पडून हल्लीचा दासबोध ग्रंथ झाला आहे. दासबोध ग्रंथ लिहिण्यास दहा वर्षें लागतील असा संकल्प करून रामदास शके १५७६ मध्यें शिवथरच्या घळींत जाऊन बसले असें दिवाकर गोसावी यांनी चाफळहून बहिरामभट यांस लिहिलेलें पत्र उपलब्ध आहे त्यावरून दिसतें. यावेळीं दासबोध ग्रंथ लिहिण्यास सुरुवात झाली असावी. दासबोधांतील दशक ६ समास ४ हा शके १५८१ मध्ये लिहिला आहे असें त्यांतील सातव्या ओवीच्या “ च्यारि सहस्र सातशे साठी । इतुकी कलयुगाची राहाटी ” या अंतःपुराव्यावरून सिद्ध होतें. शिवाय अठराव्या दशकांतील ६ वा समास की ज्यांत रामदासांनी शिवाजीस अफझुलखानाचे भेटीचे वेळीं उपदेश केला आहे असें दिसतें तोही शके १५८१ मध्यें लिहिला गेला असावा. एकंदरीत शके १५८१ हें साल दासबोधग्रंथाच्या रचनेंत महत्त्वाचें आहे असें म्हणण्यास हरकत नाही. दासबोधाच्या दोन मूळ प्रती आपल्यास उपलब्ध आहेत. डोमगांव मठांतील कल्याणांनी लिहिलेली व रा. देवांनी प्रसिद्ध केलेली एक प्रत, व शिरगाव मठातील कल्याणांचे बंधु दत्तात्रय यांनीं लिहिलेली व ग्वाल्हेरीस रा. पांगारकर यांस उपलब्ध झालेली शके १६०६ मधील दुसरी प्रत. या दोन्ही प्रती शोधून काढण्याबद्दल व रामदासांचा मूळ दासबोध आपल्यास दिल्याबद्दल रा. देव व पांगारकर यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच आहेत. रा. देवांनी आपल्यास समर्थसेवेस वाहूनच घेतलें आहे. मूळप्रतीबरहुकूमच त्यांनीं समर्थांचे जे ग्रंथ

आजपर्यंत छापले आहेत त्यांतूनच होतां होईल तों पुढील] वेंचे घेण्यांत आले आहेत. परंतु जे समर्थांचे ग्रंथ अद्याप अप्रकाशित आहेत त्यांबद्दल दुसरीकडून वेंचे घेण्याची योजना केली. आहे. रामदासांच्या मूळ ग्रंथांपैकीं पण अद्याप अप्रकाशित अशा " दासबोधाच्या सोलीव अर्था " तील एका उताऱ्याबद्दल रा. रा. गणेश गोविंद कारखानीस यांचे विशेष आभार मानले पाहिजेत. दासबोधाचा सोलीव अर्थ काय आहे हे या उताऱ्यावरून सहज कळेल. रामदासाच्या संकीर्णग्रंथांपैकी करुणाष्टकें, मनाचे श्लोक, जनस्वभावगोसावी, इत्यादि प्रकरणें या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत उध्दृत केलीं आहेत ती वाचकांच्या नजरेस येतीलच.

८. रामदासांच्या समकालीन मंडळीमध्यें त्यांचे वडिल बंधु रामीरामदास यांचा येथें प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. रामीरामदास हे रामदासांच्या अगोदर तीन वर्षें जन्मून रामदासांच्या अगोदर तीन वर्षें समाधिस्थ झाले. हे प्रत्यक्ष जरी रामदासीसांप्रदायामध्यें नव्हते, तथापि रामदासाचा व त्यांचा पुष्कळ संबंध आला असला पाहिजे हें उघड आहे. यांचे " भक्तिरहस्य " व " सुगमोपाय " हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. रामदासांच्या शिष्यांपैकी कल्याण हे प्रमुख होत. रामदासांच्या आज्ञेवरून रामदासांनी देह ठेवण्यापूर्वी तीन वर्षें हे डोमगांव येथें मठांत जाऊन राहिले; आणि रामदासांच्या देहावसानानंतर तेहतीस वर्षांनीं म्हणजे शके १६३६ त त्यांनी देह ठेविला. त्यांनी रामदासांच्या इतर कांहीं शिष्याप्रमाणें चाफळ व सज्जनगड येथील व्यवस्थेसंबंधीं तंट्यांत भाग घेतला नाहीं. रामदासांच्या शरीराचें शके १६०३ मध्यें सज्जनगडावर दहन केल्यावर त्यांच्या अस्थि चाफळ येथें आणून तेथील वृंदावनाखाली ठेवण्यांत आल्या. बरींच वर्षें त्या अस्थि गंगेस पोहोंचविण्यासंबंधीं विचार चालला होता. शेवटीं एकदां ज्या दिवशी त्या अस्थि गंगेस पोहोंचविण्याकरितां वृंदावनांतून बाहेर काढण्यांत आल्या, त्याच दिवशी कर्मधर्मसंयोगानें कल्याणांनी डोमगांव येथें आपला देह ठेविला. व गुरूच्या व शिष्याच्या अस्थि एकदमच चाफळाहून डोमगांवावरून काशीस नेण्यांत आल्या. रामदासांचे आणखी दोघे प्रमुख शिष्य म्हटले म्हणजे दिवाकर गोसावी व उद्धव गोसावी हे होत. या उभयतांमध्यें रामदासांच्या निधनानंतर बरींच वर्षें मठाच्या व्यवस्थेसंबंधीं तंटा चालला होता. रामदास जिवंत असतांनाच त्यांनीं दिवाकर गोसावी यांस मठाची व्यवस्था

करण्यासबंधी सांगितले होतें; आणि देहावसानाचे वेळी त्यांनी उद्धव गोसावी यांस मठाची व्यवस्था करण्यास सांगितलें. यामुळें उभयतांचा तंटा वाढत जाऊन शेवटी तें प्रकरण संभाजीपर्यंत गेलें. सभाजीनें दिवाकर गोसावी याच्या बाजूनें निकाल दिला. या निकालानें खिन्न होऊन उद्धव गोसावी जे एकदा शके १६०७ मध्यें टांकळीस जाऊन राहिले ते पुनः या प्रांताकडे आले नाहीत. शके १६२१ मध्यें त्यांचे देहावसान होईपर्यंत ते केवळ दुग्ध प्राशन करून होते. वासुदेव गोसावी याचा उल्लेख शिवाजी व संभाजी यांच्या सनदांसंबधी पूर्वी केलाच आहे. यांनी मंत्राची जोपासना बरोबर केली नाही म्हणून रामदासानी यास एकदां भरसभेंत ठोकून काढिलें. त्यावेळी ते जे एकदां रामदासासमोर जमिनीवर पडले ते रामदासांनी क्षमा म्हणेपर्यंत उठलेच नाहीत. आणखी रामदासांच्या शिष्यांपैकी " स्वानुभवदिनकर " या ग्रंथाचे कर्ते दिनकर गोसावी यांचा उल्लेख केला पाहिजे. नगर जिल्ह्यांतील तिसगांव मठाचे हे अधिपति असून स्वानुभवदिनकरांतील यांनी केलेलें योगाचें विवरण ज्ञानेश्वरीबरहुकूम असून फार वाचनीय आहे. रामदासांच्या शिष्यिणींपैकी वेणुबाई व अक्का या प्रमुख होत. वेणुबाईचा " सीतास्वयंवर " या नावाचा ग्रथ प्रसिद्ध आहे. त्याचा मठ अद्यापि मिरजेस आहे. रामदासांच्या समोरच त्यानी सज्जनगड येथें समाधि घेतली, ती आजतागायतही तेथें दृष्टीस पडते. अक्का या रामदासांनंतर चाळीस वर्षे राहिल्या. सज्जनगड येथें रामाच्या मूर्तीवर जें देऊळ बाधले गेलें ते यांच्याच नेतृत्वाखाली होय. यांचीही समाधि सज्जनगड येथेंच आहे. गिरिधर हे वेणुबाई व बाईयाबाई यांचे शिष्य असून त्यांनी रामदासांस पाहिलें होतें. रामदासांनी समाधि घेतली त्यावेळी हे पंचवीस वर्षाचे असल्याने रामदासांचे चरित्र त्यांस पूर्ण अवगत असलें पाहिजे. हे बीड मठाचे अधिपति असून रामदासाच्या समोर त्यांनी एकदां कीर्तनही केलें होतें; यांचा ग्रंथ " समर्थप्रताप " हें एक समर्थांचें चरित्रच असल्यानें व तेंही प्रत्यक्ष समर्थांस पाहिलेल्या गृहस्थानें लिहिलेलें असल्यानें त्याची किंमत विशेष आहे. रामदासांनी समाधि घेतल्यावर अर्धशतकानें हा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथामध्यें १८·३६ यांत अफझुलखानाचा वध, चाफळ मठाचा जीर्णोद्धार, व प्रतापगड येथें शके १५८३ साली समर्थांकडून तुळजादेवीची स्थापना, या सर्वांचा उल्लेख आहे. आत्माराम यांनी " दासविश्रामधाम " या नांवाचा जो प्रचंड ग्रंथ लिहिला आहे त्यांतील सर्व कथा गिरिधरांच्या समर्थ-

मतापाइतक्या विश्वसनीय नसल्या, तथापि रामदासांची मुख्य शिकवण कोणती, रामदासांस अनुभव कसा प्राप्त झाला, वगैरे गोष्टींबद्दल त्यांतील मजकूर फार विचारणीय आहे.

## दासबोधविवरण.

९. आतां आपण आपल्या प्रस्तुतच्या पुस्तकांत रामदासांच्या ग्रंथांतून जे उतारे घेतले आहेत त्यांच्या अल्पमात्र चर्चेकडे वळूं. सर्व विषयाचें संपूर्ण विवेचन करण्यास स्वतंत्र ग्रंथच लिहिला पाहिजे. तथापि या लहानशा प्रस्तावनेंत रामदासवचनामृताचे अल्पमात्र स्वारस्य तरी लोकांस देणें जरूरीचें आहे. क्रमांक १ यांमध्ये रामदासांनी अफझुलखानाचे भेटीचे वेळी शिवाजीस केलेला उपदेश ग्रथित केला आहे असें त्यांतील " म्लेंच दुर्जन उदंड । बहुतां देसांचें माजलें बंड " हे वाक्य, व शिवाजीस देवब्राह्मणांची चिंता वाहण्याविषयीं उपदेश, यांवरून सिद्ध होत आहे. क्रमांक २ मध्यें रामदासांनी आपल्या वेळेस ब्राह्मणांस अन्नसुद्धां मिळत नव्हतें, व म्लेंच्छांनीं व अन्य याति यांनीं ( अर्थभेद-रणांगणावर ) राज्य पादाक्रांत केलें होतें असें लिहिले आहे. क्रमांक ३ मध्यें रामदासांनी आपल्या विश्वपाळित्या उपासनेचें वर्णन केलें असून नारायणाचें ध्यान केलें असतां लक्ष्मी भक्तांपासून जाणार नाहीं असें सुचविलें आहे. क्रमांक ४ मध्यें दुर्जनांचा संहार करणाऱ्या व भक्तांस आधारभूत अशा देवाचें स्मरण केलें असतां मनीं इच्छिलेलें कार्य सिद्ध होतें; फक्त कर्तृवाचा अहंकार आपल्याकडे लावून घेऊं नये असें रामदासांनी सांगितले आहे.

१०. क्रमांक ५ पासून ज्ञानचर्चा सुरू झाली आहे. प्रथम क्रमांक ५ मध्यें भूगर्भशास्त्र, प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, तर्कमीमांसा, भूतभविष्यज्ञान, दुसऱ्यांच्या जीवींचें ज्ञान, इत्यादि नानाप्रकारची जी ज्ञानें त्यांस ज्ञान हें नांव योग्य नसून आपलें स्वरूपदर्शन यासच ज्ञान म्हणावें, तोच मुख्य देव जाणावा, महावाक्याचा जप न करितां केवळ विचार करावा, सर्व संतांचें गुह्यज्ञान तें हेंच होय, स्वामी कृपेसहित अंतःकरणांत वसल्यास त्यासच ज्ञान म्हणावें, असें क्रमांक ६ मध्यें लिहिलें आहे. क्रमांक ७ यांत अशा ज्ञानाच्या योगानें सर्व पातकांचें भस्म होऊन पुण्य अमूप झाल्यानें आपली सीग सांडून जातें असें रामदासांनीं लिहिलें आहे. नंतर मुख्य देव कोणता याचा विचार सुरू होऊन

नानाप्रकारच्या मूर्ती वगैरे " देव " या नांवास योग्य नसून फक्त अंतरात्माच देव आहे असें सिद्ध केलें आहे. मूर्तीस लोक चोरून नेतील अगर फोडून टाकतील. अशा प्रकारचे देव नर्मदागंडकातीरीं लक्षावधि पडले आहेत, पण खऱ्या देवाचें सत्त्व कधीही जाणार नाहीं असें रामदासांनी लिहिलें आहे ( क्र. ८ ). जगामध्यें चार प्रकारचे देव प्रसिद्ध आहेत. एक प्रतिमादेव, दुसरा अवतारदेव, तिसरा अंतरात्मादेव, व चौथा निर्विकारी देव. यांमध्यें निर्विकारीदेवासच देव म्हणावें असें रामदासांनी लिहिलें आहे (क्र. ९). शाईचा व्यापार करून कोठें राज्यसंपदा प्राप्त झाली आहे काय ? म्हणून सुरता करून पाहणें यास देवदर्शन म्हणूं नये ( क्र. १० ). खरा देव केवळ सद्गुरूच्या योगानेंच प्राप्त होतो व त्यामुळे नानाप्रकारच्या देवांची भीड पडत नाही ( क्र. ११ ). अंतर्देवास चुकून धांवा घेऊन तीर्थास गेलें असतां जेथें तेथें केवळ धोंडापाणी दिसेल ( क्र. १२ ). नाना देवांच्या अंतर्भूत असलेल्या आत्मदेवाच्या अनुसंधानानें सर्व किल्मिष जळून जाईल ( क्र. १३ ) असें रामदास म्हणतात.

११. रामदासांचा भुताखेतांवर व चमत्कारांवर अगदीच विश्वास नव्हता असें दिसत नाही. शापामुळें देहधारण, परकायाप्रवेश, वायुरूपानें देवताभूतांचा अंगीं संचार, वायुस्वरूप झोटिंगाच्या लीला, या गोष्टीस अभावाने नेऊं नका ( क्र. १४-१५ ), फक्त ज्यांस संकल्पच नाही अशा ज्ञात्यांस यांच्याने बाधवत नाही ( क्र. १६), असें रामदासांचें मत आहे. याच्या उलट, बिष्णु म्हणजे केवळ विश्वांतील जाणीव, रुद्र म्हणजे केवळ नेणीव, व ब्रह्मा म्हणजे जाणीवनेणीवेचें संमिश्रण ( क्र.१७ ), अगर ब्रह्म्यास जगाची उत्पत्ति, विष्णूस प्रतिपालन, रुद्रास संहार, अशीं जी कामें सोंपवून दिली आहेत तीं काल्पनिक असून सगळ्या जगाचा उत्पत्तिस्थितिलयकर्ता केवळ एक अंतर्देव आहे ( क्र. १८ ) असें रामदासांचें मत आहे. ब्रह्मा, विष्णु, महेश, हा ऐलीकडील विचार, चंद्रसूर्यतारांगणें हा ऐलीकडील विचार, नाना देवांचे अवतार हा ऐलीकडील विचार; हीं दृश्यें केवळ देवाचें महाद्वार होत; यांस ओलांडून गेल्यावांचून देवाचें दर्शन व्हावयाचें नाही ( क्र. २० ). ज्याच्यामुळें सूर्यबिंब धांवतें, धुकटामध्यें अगाध पाणी सांचून राहतें, काळाचा दूत म्हणून वारा ज्याच्यामुळें धांव घेतो, विजांच्या तडाख्यांतही जो अंतर्भूत आहे, त्या देवाचीच उपासना ही माझी उपासना आहे असें रामदास म्हणतात ( क्र. २१ ). ज्याचें नांव सर्वकर्ता, ज्याच्यामुळें

मेघमाळा, चंद्रबिंब, रविमंडळ हीं अपापल्या ठिकाणीं स्थित आहेत, त्यासच देव म्हणावें; दे्व्हारींच्या देवास उठून ब्रह्मकटाव रचतां येणार नाहीं; जो अंतर्बाह्य व्यापून असणारा अंतरात्मा आहे, त्यासच देव म्हणावें; देव आला, देव गेला ही भाषा दुरिताची आहे ( क. २२ ); देह, आत्मा, व ब्रह्म यांचा संबंध जड चंचळ निश्चळाप्रमाणें आहे ( क २३ ); ज्याप्रमाणें घटाकाश, मठाकाश, महदाकाश, चिदाकाश मिळून सर्व एकच आकाश होतें, त्याप्रमाणें जीवात्मा, शिवात्मा, परमात्मा व निर्मळात्मा मिळून सर्व एकच आत्मा होय ( क. २४ ); केवळ भिडेस पडू नका; ज्यानें राजा ओळखिला तो भलत्यास राव म्हणणार नाहीं ( क. २५ ) असें सांगून मुख्य देवास शोधून काढणें हेच तत्त्वज्ञानाचे लक्षण होय असे रामदासानी सांगितलें आहे.

१२. या देवाचा साक्षात्कार कसा करून घ्यावा हा एक मोठा प्रश्नच आहे. जगातील नाशिवंत वस्तूंचा भंरवसा नसल्यानें ज्यास सुख पाहिजे असेल त्याने केवळ रघुनाथभजन केलें पाहिजे ( क. २६ ); या संसाराच्या यात्रेंत देवाचा फायदा करून घेतला नाहीं तर आपले कष्ट सफल होणार नाहीत ( क. २७ ); या देहाचें हें एक बरें आहे की जी जी परमार्थवांछा या देहामध्ये करावी ती ती तृप्त होते, या नरदेहास येऊन हजारों लोक उद्धरागतीस गेले आहेत ( क. २८ ); शिवाय मृत्यूच्या वेदना सोसवत नाहींत हें सगळ्यांच्या अनुभवाचेंच आहे ( क. २९ ). या मृत्यूपुढे महापराक्रमी राजे, महान् व्युत्पन्न पंडित, मोठमोठे योगाभ्यासी, महान् महान् संत, कोणीच टिकले नाहीत. फक्त एकच टिकले की ज्यांनीं स्वरूपसाक्षात्कार करून घेतला ( क. ३० ). यामुळे सर्व गोष्टी सोडून देवास धुंडणें हेंच आपले संसारांतील मुख्य कर्तव्य आहे (क. ३१). याच जन्मी ईश्वरसाक्षात्कार झाला तर त्याचा उपयोग; पुढील जन्मावर कोणी भिस्त ठेवावी ! उधार आणि रोकडें धन यामध्यें जो फरक आहे तोच विदेहमुक्ति व जीवन्मुक्ति यांच्यामध्यें आहे ( क. ३२ ); परंतु मनुष्याची दृष्टि अंध झाली असल्यानें द्रव्यद्वारा नेत्रानें पाहणें, द्रव्यद्वारा कानानें ऐकणें, यांखेरीज दुसरा व्यापारच त्यास सुचत नाहीं ( क. ३३ ). या बद्धस्थितीतून विनिर्मुक्त होण्यास गुरूची आवश्यकता आहे. मागें महान् महान् संतसाधु, रामकृष्णादिक अवतार, यांनीं गुरूचाच आश्रय केलेला आहे ( क. ३४ ) सद्गुरुकृपा झाल्याखेरीज अनुभवचिद्रत्नांच्या भांडारगृहाची किल्ली हातास येत नाहीं ( क. ३५ ).

असा जो गुरु तो एकापरी देवापेक्षांही श्रेष्ठ समजला पाहिजे ( क. ३६ ); अशा सद्गुरूस सागर, मेरु, गगन, पृथ्वी, गभस्ति, फणिवर, कल्पतरु, इत्यादिकांपैकी कोणतीही उपमा लागूं पडत नाही. सद्गुरूचे वर्णन करता येणें अशक्य आहे, हेंच त्याचें वर्णन होय ( क. ३७ ). अशा सद्गुरूची चिन्हें कोणती म्हणाल तर तीं शुद्ध आत्मज्ञान, स्वरूपस्थितीचें समाधान, प्रबळ वैराग्य, निर्मळ आचार, अखंड अध्यात्मश्रवण, तत्त्वज्ञानविचार ही होत ( क. ३८ ). ज्याच्या पोटांत अमृत गेलें त्याचें शरीर तेजस्वी व्हावयासच पाहिजे. जो स्वरूपस्थितीनें वर्ततो तोच साधु. राज्यावर बसल्यावर अंगी राजकळा सहजच बाणते, त्याप्रमाणें स्वरूपारूढ झाल्यावर कामक्रोध, मदमत्सर, लोभशोक, मोहभय, इत्यादि विकार सहजच नाहीसे होतात. स्वधर्माची व्याख्या म्हणजे केवळ स्वरूपस्थितीत राहणें हीच होय ( क. ३९ ). आजपर्यंत कोणत्या चक्रवर्ती राजानें सायुज्यमुक्ति दिली आहे ? जें त्रैलोक्यांत नाही त्याचें दान संतसज्जन करितात. जें चंद्र-सूर्यानें प्रकाशित होत नाही तें या साधूंच्यामुळे प्रकट होते ( क. ४० ); असे साधु जेथें भजन करितात तेथें प्रत्यक्ष जगदीश उभा असतो ( क. ४१ ). या साधूंच्या मागें जे चमत्कार होतात ते केवळ हे पुण्यमार्गानें चालले म्हणूनच होतात. अशा साधूंस वासना धरून पुनः जन्म घेण्यास लावूं नका ( क. ४२ ); पूर्वी मोठमोठे भक्त होऊन गेले व त्यांचें सामर्थ्यही अद्भुत होतें असें समजून हल्लीच्या साधूंस तुच्छ करूं नका; शरीराचा ध्यास केवळ सामर्थ्यसिद्धीकडे असल्यानें मनुष्य सहज ईश्वराचा मार्ग चुकून जातो; तर असें न करतां ईश्वरप्राप्तीच्या कामनेखेरीज दुसरी कोणतीही कामना मनांत बाळगूं नये ( क. ४३ ).

१३. ज्याच्यामध्यें ही ईश्वरकामना उत्पन्न झाली, जो अत्यंत सात्त्वपी, धैर्यवान् व प्रज्ञावंत आहे, जो त्रिविधतापानें पोळून जाऊन गुरुवचनावर दृढभाव ठेवितो, व आकाश कोसळून पडलें असतांही ज्याच्या शुद्ध भावार्थांत पालट होत नाहीं, तोच सच्छिष्य होय ( क. ४४ ). अशा शिष्यास मोक्षप्राप्तीस मुळींच वेळ लागत नाहीं. लोहपरिससंयोग, गंगासरितासंयोग, अगर सिंधुसागरसंयोगाप्रमाणें अशा शिष्यास तत्क्षणींच मोक्ष मिळतो ( क. ४५ ). ज्यांत सत्त्वगुणाचें वर्चस्व असेल असाच सच्छिष्य शिष्यराज या नांवास शोभतो. सत्त्वगुणाचीं लक्षणें म्हटलीं म्हणजे संसारदुःख विसरून भक्तिमार्गाकडे तांतडीनें ओढ घेणें,

नीच दास्यत्वाची गोडी पतकरणें, यथानुशक्ति सामग्री घेऊन ईश्वरयज्ञास प्रवृत्त होणें, मुखीं नाम हातीं टाळी वाहून ईश्वराचें गुणसंकीर्तन करणें, आघातांत धारिष्ट धरणें, पदार्थमात्रावर चित्त न लागता मनांत भगवंताचा ध्यास लागणें, भगवताकरितां सर्व सुख सोडून देणें, शरीर सत्कार्यीं लावण्याचा निश्चय करणें, समुद्राऐशी चित्तांत सांठवण बाळगणें ही होत ( क्र. ४६ ). ईश्वरसाक्षात्कारास मुख्य साधन म्हटलें म्हणजे नामस्मरण हे होय. प्रातःकाळीं, माध्यान्हकाळीं, सायंकाळीं नेमानें साधन करून नेहमी नामस्मरण करीत जावें. सुखदुःख, संपत्तिविपत्ति, संकट आनंद वगैरे कोणत्याही स्थितीत नामस्मरण सोडूं नये. नामानें संकटे नासतात, व विघ्नें निवारतात; महापापी तेच पवित्र होतात. कांही न करिता नामजप केला असतां चक्रपाणी संतुष्ट होऊन भक्तांस सांभाळतो. लहानथोर, उच्चनीच, ब्राह्मणअंत्यज, हा भेद नामस्मरणामध्यें नाही ( क्र. ४७ ). नामस्मरणरूप उपासनेचा पाठिंबा जेथें नाही तेथें जय प्राप्त होणार नाही ( क्र. ४८ ). प्रत्येक चळवळीच्या मुळाशीं भगवंताचें अधिष्ठान असलें पाहिजे. पायरीनें पायरी चढून मुळापर्यंत शोधिलें असतां याचा उलगडा होणार आहे ( क्र. ४९ ). ईश्वराबद्दल नामस्मरणरूप भक्ति करणें ती निष्काम करावी. कामनेनें मिळालेलें फळ व निष्काम भजनानें मिळालेला भगवंत यांमध्यें महदंतर आहे. निष्कामभजन करणाऱ्या भक्ताच्या मनांत जो हेतु उत्पन्न होतो तो देव आपणच पुरवितो ( क्र. ५० ). निष्कामभजनाच्या जोडीला श्रवणाचें बळ पाहिजे. श्रवणानें भक्ति व विरक्ति उद्भवतात, चित्तशुद्धि होते, निश्चय घडतो, आशंका फिटतात, मन ताब्यांत येते व त्यास भगवंताची भूक लागते ( क्र. ५१ ). श्रवणाप्रमाणेंच कीर्तनाचीही फार जरूरी आहे. कीर्तनांत स्त्रियादिकांचें कौतुक वर्णिलें असता श्रोत्यावक्त्यांचे मन कामाकार होऊन ईश्वराचे ध्यान नाहीसें होतें. निःशंक निर्लज्ज कीर्तन केलें असतां गुप्त परमात्मा प्रकट होतो ( क्र.५२ ). अशा रीतीनें ज्याच्या जवळ ईश्वर अखंड राहतो तो जे सहज बोलतो ते ईश्वराचेच शब्द होत ( क्र. ५३ ).

१४. साधकांस ध्यानक्रिया सांगितली असतां मनामध्यें कल्पनेचें काहूर उठून ध्यानयोग सिद्ध होत नाहीं हा साधकांचा अनुभव सर्वांस माहीत आहेच. याकरितां मन निर्विकल्प करण्याबद्दल रामदासांनीं एक उपाय सुचविला आहे. जसा काम कामानें मरतो तशी कल्पना कल्पनेनें मरते ( क्र. ५४ ). निर्वि

कल्पाच ध्यान केलें असतां कल्पना सहजच नाहींशा होतात ( क. ५५ ). खरें ध्यान व खोटें ध्यान यांमध्ये इतकाच फरक आहे की, खऱ्या ध्यानांत आत्म्याचें चिंतन होतें, व खोट्या ध्यानांत अनात्म्याचें चिंतन होतें. ध्येय व ध्याता यांमध्यें अनन्यलक्षण उत्पन्न झाल्यासच ध्यानाची परिसमाप्ति झाली असें म्हणतां येईल. बाजारी लोकास प्रमाण आणि अप्रमाण या गोष्टी कळत नसल्यानें खोट्याच गोष्टी उठवून ते वाउग्याच बोंबा मारतात. साधकांनीं मानसपूजा व प्रत्यक्ष दर्शन यांमध्यें महदंतर आहे असें समजून खऱ्या ध्यानाचा मार्ग शोधून काढावा ( क. ५६ ). ज्यास आत्मज्ञानाची किल्ली मिळाली, संदेहनिवृत्तीकरितां जो परिश्रम करतो, जीर्ण जर्जर झालेल्या आत्मज्ञानाचा जो जीर्णोद्धार करण्यास प्रवृत्त होतो, असत्क्रिया सोडून स्वरूपाकडे जो अखंड निजध्यास लावितो, जें लक्षूं जातांही लक्षवत नाही त्यास जो लक्षितो, जेथें मनबुद्धीचा प्रवेशही नाही त्यांचें जो अनुभवानें आकलन करितो, व उन्मनीच्या शेवटी आपली आपणांस ज्यास अखंड भेट अनुभावितां येते, त्यासच साधक म्हणतां येईल ( क. ५७ ). अशा साधकामध्यें व देवामध्यें सख्यभक्ति उत्पन्न होते. आपली संसारव्यथा सोडून आपण देवाचें चिंतन केलें असतां देव आपली चिंता करतो. देवाच्या सख्यत्वासाठी आपले सौख्य, जिवलग, प्रपंच, व प्राण वेंचण्यासही साधकाने तयार व्हावे. आपण ज्याप्रमाणें वचने बोलावीत त्या-प्रमाणें प्रत्युत्तेर येतात. म्हणून आपण ज्या भावना ईश्वराविषयी ठेवाव्यात त्या भावना ईश्वर आपल्याविषयी ठेवितो ( क. ५८ ). महापूजेच्या अंती ज्या-प्रमाणें देवास मस्तक वाहतात त्याप्रमाणें आत्मनिवेदनभक्ति आहे. देव व भक्त हे दोघे एकच आहेत अशी ज्याची खात्री पटली तोच साधु या जगांत मोक्ष-दायक जाणावा ( क ५९ ). आपण आत्मरूप आहों अशी खात्री पटल्यावर देह प्रारब्धाच्या ओघांत खुशाल सोडून देण्यास काय हरकत आहे ( क. ६० )? सलोकता, समीपता, सरूपता या तीन्ही मुक्तापेक्षां ईश्वराशी जीत तादात्म्य होतें अशी सायुज्यमुक्ति श्रेष्ठ आहे ( क. ६१ ). ज्यानें आपण आपणांस ओळखिलें तो जीत असतांच मुक्त होऊन गेला. देह पुण्यनदीच्या तीरावर पडावा, दक्षिणायनापेक्षां उत्तरायणच देह सोडण्यास योग्य, "अग्निर्ज्योतिरहः शुक्लः" हा अर्चिमार्ग धूम्रमार्गापेक्षां श्रेष्ठ होय, अशा प्रकारच्या खोट्या कल्पना साधूच्या मनास शिवत नाहीत. जो जीवन्मुक्त झाला त्याचा देह रानांत पडो, अगर स्मशानांत पडो, तो धन्यच होय ( क. ६२ ).

१५. सिद्धावस्था प्राप्त झाल्यानंतर साधनाची जरूरी राहते किंवा नाही याबद्दल रामदासांनी दोन निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळी मतें प्रतिपादिलीं आहेत. एकदां त्यांनी असें म्हटलें आहे की साधन हा देहाचा धर्म असल्यानें देह असेपर्यंत साधन हे केलेच पाहिजे. सिद्ध झाल्यावर हा अद्यापिही साधन करतो असें लोक म्हणतील या लज्जेने साधन टाकून देणें हे शहाणपणाचें काम नव्हे ( क. ६३ ) याच्या उलट दुसरे एके ठिकाणी त्यानी असे म्हटले आहे की, साधनानें साध्य प्राप्त झाल्यावर साधनाची खटपट करणें म्हणजे कुंभार राजा झाल्यावर पुनः त्यानें आपली मडकी घडणे,अगर रंक राजा झाल्यावर रंकपणाचा गलबला त्याने पुनः चालविणे, तीर्थाने तीर्थास जाणे, अगर उन्मन्यवस्थेनें मनास आवरणे, याप्रमाणेच चमत्कारिक आहे ( क. ६४ ). मुख्य साक्षात्काराचे लक्षण म्हटलें म्हणजे पापाची खंडणा झाली व जन्मयातना चुकली असा अनुभव आला पाहिजे, देवभक्तांतील विभक्तता निवून गेली पाहिजे, ब्रह्मांडाच्या कर्त्यास ओळखून मुख्य कर्तृत्वाचे स्वरूप कळलें पाहिजे; येथें अनुमान राहिल्यास केलेला परमार्थ वायां गेला असें रामदासांनी म्हटलें आहे ( क. ६५ ). योग्याच्या अनुभवदृष्टीपुढे जें उदंड धन आहे त्याची किंमत लोकांस कशी कळावी ? जो काष्ठस्वार्थ करतो, अगर शुभा एकवटतो, त्यास श्रेष्ठरत्नांची किंमत कशी कळणार ? हे गुप्तधन सांपडण्याकरितां सद्गुरूच्या उपदेशाचें अजन लेइलें पाहिजे ( क. ६६ ). ज्यास भेटूं जाता तुटी पडते, व ज्याची न भेटतां भेट होते, जें पाहूं जातां दिसत नाही, व न पाहतांही जें सर्वत्र दिसतें, तेंच स्वरूप असें समजावें ( क. ६७ ). ज्यास तस्कराचें भय नाही, ज्यास राजभय, अग्निभय अगर श्वापदभय मुळीच नाहीत, जें अधिक व न्यून होत नाही, जे मिळविण्याकरिता योगियांच्या अनुज्ञेप्रमाणे आकाशमार्गीच्या गुप्तपंथानें चालावें लागते, ज्याची प्राप्ति झाली असतां राजाचे सामर्थ्य अंगीं बाणतें, व ज्याच्यावांचून राजेही भिकारीसे दिसतात, तोच केवळ परमार्थ होय ( क. ६९ ). ज्यास शस्त्रानें तोडिलें असतां तुटत नाही, जें अग्नीवर असून जळत नाहीं, जें सर्वत्र सूक्ष्म रीतीनें भरलेलें आहे ( क ७० ), जें अनंत ब्रह्मांडाखालतें व अनंत ब्रह्मांडावरुतें आहे, जळानें जसें जळचरांस व्यापावें तसें जें सर्व सृष्टीस व्यापून आहे, जें वज्रास भेदिलें असून ज्याचा मृदुपणा गेला नाही, जें कधींही विन्मुख न होतां अखंड सन्मुख असतें, ज्या-

मध्येंच पाहणे ऐकणें, वगैरे क्रिया घडतात, जे अत्यंत निकट पदार्थाच्याही अलीकडचे आहे, जें वाचूं लागले असता अक्षरांमध्येच दिसतें, जें कोणतीही वस्तु घेण्याच्या अगोदर हातांत येते, जें चर्मदृष्टीचें देखणें नसून ज्ञानदृष्टीचे देखणें आहे, तेच परब्रह्म होय ( क. ७१ ) जें धरूं जातां धरवत नाही, जें टाकू जाता टाकवत नाही, जे सर्वांचे मस्तकी सूर्याप्रमाणे प्रकाशते, ज्यास पहावयास तीर्थक्षेत्रांस जावे लागत नाही, जे बैसलेठायींच सबाह्यांतरी व्यापून दिसते, जे वामसव्य, अधऊर्ध्व, सन्मुखविन्मुख सर्वत्र एकदम असते, ज्याच्या असंभाव्य विस्ताराची कल्पनाही कोणास होणार नाही, अशा त्या विमळ ब्रह्माची सरी कोणास यावी ( क. ७२ )? अशा रीतीनें रामदासांनी ब्रह्माच्या सर्वगत अस्तित्वाचे मोठ्या बहारीने वर्णन केलें आहे.

१६. रामदासांसारखे कर्मयोगी रामदासच होत. परमार्थाचा अनुभव घेऊन जगात योग्य रीतीनें वर्तणूक करण्याचे भाग्य थोड्या साधूंसच लाभते. अशा साधूंत रामदासांची प्रामुख्यानें गणना होते असे म्हणण्यास हरकत नाही. विशेषेंकरून त्यांच्या दासबोधग्रंथात पारमार्थिक कर्मयोग्याची वर्तणूक कशी असावी याबद्दल त्यांनी जे विचार प्रकट केले आहेत ते आपल्या स्वतःच्याच अनुभवावरून केले आहेत, तथापि त्यांपासून इतरानीही पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. साधूने कीर्तिरूपानें उदंड विख्यात असावे, परंतु पाहू गेलें असतां त्यानें एकाएकी सापडू नये, असे रामदासानी लिहिले आहे. ज्या स्थळास जावयाचें ते सांगू नये, व जे ठिकाण सागावें त्या ठिकाणी जाऊं नये; अशा प्रकार आपली स्थितिगति लोकांच्या निदर्शनास आणू नये, असें रामदासानी म्हटलं आहे. लोकांस जें पहावेंसें वाटतें तें यानें पाहूं नये. यानें उदंड समुदाय करावे; पण गुप्तरूपानें करावे. लोकाचे निरनिराळे अधिकार शोधून त्यास जवळ अगर दूर ठेवावे; पण आपला मगज काहीतरी बाळगून रहावे. महंतानें महंत करून त्यांस नाना देशी विखरावें ( क. ७३ ). आपण मनापासून भक्ति केल्यास अशा महापुरुषाचें दर्शन घ्यावें म्हणून लोक त्यांस धुंडीत येतील. शिष्यास कोणतीही गोष्ट न मागण्याची त्याने प्रतिज्ञा करावी. फक्त आपणांमागें जगदीशास भजत जावें इतकेंच मागावें ( क. ७४ ). ज्याप्रमाणें आत्मा ठायींच्या ठायीं गुप्त होतो त्याप्रमाणें साधूनें तेथल्या तेथेंच नाहींसें होऊन सर्व लोकांस गुप्तरीतीनें वर्तवीत असावे ( क. ७५ ). मुख्य लोकांचें मनोगत राखणें

हेंच मोठ्या चातुर्याचें लक्षण होय ( क्र. ७७ ). आपण करून करवावें; आपण विवरून विवरवावें; आपण भजनमार्गास धरून लोकांकडूनही धरवावें. जो करून बोलेल त्याचेच शब्द जगात प्रमाण मानितात ( क्र. ७८ ); नष्ट लोकांशी गांठ पडली असतां नष्टांकडूनच त्यांचा पराभव करवावा; हुब्यास हुंबा लावून द्यावा; खटनटाची फजिती खटनटाकडूनच करवावी. ज्याला समुदाय मोठा व्हावा अशी इच्छा असेल त्याच्या तनावा बळकट असाव्या लागतात. जो दुसऱ्यांवर विसंबून राहतो त्याचा कार्यभाग बुडतो· जो आपणच कष्टत जातो त्यासच स्वीकृत कार्यांत यश येतें ( क्र. ७९ ). " कांहीं गल्बला कांहीं निवळ " अशा संमिश्रणानें आपला काल घालवीत जावा ( क्र. ८० ). लोक आपली मार्गप्रतीक्षा करीत असतां वेळेस तत्काळ अशा साधूनें पुढें उभें रहावे. वडिलाचे मन जसें सर्व मुलांवर असतें त्याप्रमाणें अशा महापुरुषानें सर्वत्रांची चिंता करीत जावी ( क्र. ८१ ). आपण जेथें तेथें नित्य नवा असून लोकांस हा असावा असें नेहमी वाटत असावें. कांहीं तरी एक उत्कट कार्य केल्याखेरिज कीर्ति होत नाहीं हे मनांत बाळगावे. जेथें अखंड तजविजा चाळणा होतात तेथें कार्य करण्याचे निरनिराळे मार्ग सुचतात. यामुळें एकांतांत जाऊन विवेक करावा, व आत्मारामाचें दर्शन घ्यावें ( क्र. ८२ ). जो एक क्षणही वायां जाऊं· देणार नाहीं त्यासच तीक्ष्णबुद्धीचा म्हणावे. ज्याच्या तोडांतून अखंड वाक्प्रवाह सुरू असतो त्यासच लोकांची अंतःकरणें आपल्या ताब्यात घेता येतात. जेथें तेथें लोकांस भजनास लावून आपण तेथून निसटावें. उदासवृत्तीच्या बळानें आल्यागेल्याची क्षिती नाहीं असें झाले पाहिजे. आपण जेथे कोणीच पाहणार नाही अशा खनाळामध्यें जाऊन ईश्वराचे ध्यान करून सर्वत्राची चिंता वाहिली असता त्याची मनें सहजच आपल्याकडे आकृष्ट होतील. अशा मनुष्यानेंच जन्मास येऊन सार्थक केले असें रामदासांनी लिहिलें आहे ( क्र. ८३ ).

## संकीर्णग्रंथविवरण.

१७. रामदासांचा " जुना दासबोध " या नांवाचा जो ग्रंथ आहे तो आपल्या दासबोधाचें मूळ होय असें आपण वर पाहिलेंच आहे. त्यांतील व यातील शिकवण यात फारच साम्य आहे हे त्यांचा अभ्यास करणाऱ्यांस सहज दिसून येईल. येथें आपणांस जुन्या दासबोधापैकीं दोनचारच नवे मुद्दे उद्धृत

करावयाचे आहेत. क्रमांक ५ यांत " देह पडो कां देव जोडो" अशा भावनेने देवाच्या पाठीशी लागल्यावांचून देवाचें दर्शन व्हावयाचें नाही असें रामदासानी लिहिलें आहे ( क्र. ८५ ). क्रमांक ८६ यांत ज्यास परमार्थ करावयाचा आहे त्यानें प्रपंचाची मिठी सोडविली पाहिजे असें स्पष्ट सांगितलें आहे. दासबोधांत याच्या उलट " प्रपंचपरमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी " असें जें रामदासांनी सांगितलें आहे तें ध्यानांत ठेविलें पाहिजे. क्रमांक ८७ मध्यें कोणास कळू न देतां अंतरीच रामाचा अखंड जप चालल्यावर जो साक्षात्कार होतो तो आपल्यास लोकांनी मोठे म्हणावें या बुद्धीनें लोकांस सांगितला असतां तो पुनः होणार नाही असा रामदास आपल्या जीवींचा अनुभव सांगतात. क्रमाक ८८ मध्यें रामास मागणें असेल तर आपण राम व्हावें, व रामाने आपलें दास्य करावें, इतकेंच त्यास मागावें असें सांगितलें आहे.

१८. मनाचे श्लोक सर्व उद्धृत करण्यास येथें जागा नाहीं. तथापि त्यांतील कांहीं निवडक श्लोक या पुस्तकात घेतल्यावांचून गत्यंतरच नव्हतें. भक्तिपंथ हाच सगळ्यांत सोपा पथ; प्रभाती रामाचें चिंतन करावें; ज्यामुळें आपली कीर्ति मागें उरेल अशा प्रकारची क्रिया येथे करावी; समर्थाच्या सेवकास वक्र पाहण्यास काळही समर्थ होणार नाही; देव अल्पमात्र आपले धारिष्ट पहात असतो; संकटात स्वामी एकदम उडी घालतो; देवकार्यांत देह झिजविण्याची वासना आपण बळकट ठेवावी; राम हा कल्पतरु असल्यानें त्याच्या खालीं मागितलेली फळे येतात; जातां, येतां, जेवितां, सुखी होतां, नामस्मरण करावें; देव हा श्वेतही नाही व पीतही नाही; हाती घेऊं गेलें असता तो सापडत नाही; विधीस निर्माण करणारा, विष्णूचे प्रतिपालन करणारा, व शंकरास शेवटी जाळणारा तोच मुख्य देव होय; असा जो मोठा देव तो या जगांत चोरला असल्यानें गुरूवांचून तो दिसत नाही; व या देवाचे स्वरूप नभासारखें विस्तीर्ण, व्यापक, अलिप्त, व निर्विकार आहे, अशा प्रकारच्या कल्पना ज्या मनाच्या श्लोकांत रामदासानी सांगितल्या आहेत त्या सर्वांच्या माहितीच्याच आहेत.

१९. प्रस्तुत पुस्तकांत समर्थांच्या "पंचसमासी" पैकी दोनच उतारे घेतले आहेत. पहिल्यांत मन पांगळून बुद्धि ज्यावेळी स्वरूपांत लीन होते, अनुभव अनुभवामध्यें मुरून जातो, व निष्कलंक निर्मळ आत्मा प्रकाशमान होतो त्या स्थितीसच स्वरूपानुसंधान म्हणावें असें रामदासांनी म्हटलें आहे ( क्र. ९० ). दुसऱ्यांत सर्वत्र रामदर्शन कसें होतें हें रामदासांनी सांगितलें आहे. वृत्ति

मुळाकडे पाहूं लागल्यास तिला रामच दिसतो; मन मुरडले असता त्यास रामच भेटतो; वदन चुकवूं गेलें असतां सन्मुख रामच दिसतो; एकदां सन्मुख झाल्यावर केव्हाही राम विन्मुख होत नाही; विसरून पाहेलें असतां सुद्धां रामाचेंच दर्शन होतें; अशी खूण सर्वत्रांस सांगून रामदास या जगांतून पार झाले असें म्हटलें आहे ( क्र. ९१ ). "मानपंचक" या प्रकरणांतूनही दोनच उतारे घेतले आहेत. पहिल्यांत रामराज्याचे वर्णन आहे. रामराज्य त्यासच म्हणावें की, ज्यांत बहुवृष्टि अनावृष्टि नाहीत; चिंता व व्याधि याचा लेशही नाही; युद्ध व दारिद्र्य नाहीच नाहीत; सर्वत्र सत्याचे साम्राज्य आहे; भूमि अद्भुत पिकतात, व वृक्ष सदा फळ देतात; श्वापद, पक्षी वगैरे जीव नेहमी आनंदरूप विचरतात; व कीर्तन व नामघोष यांच्या गर्जनेने सर्व पृथ्वी दुमदुमून जाते ( क्र. ९२ ). दुसऱ्या उताऱ्यांत रामाचें ध्यान करणे, अगर शिवाचे ध्यान करणे, अगर शक्तीचें ध्यान करणे, अगर इतर कोणत्याही देवतेचें ध्यान करणें, हें सर्व सारखेंच होय असें रामदासानी सांगितलें आहे. मानवांचे सेवक नानापरीनें कष्टतात; मी देवांचा देव सेविल्याने धन्य झालो असे रामदासानी येथें उद्गार काढले आहेत ( क्र. ९३ ). "निर्गुण ध्यान" या प्रकरणातून एकच उतारा घेतला आहे. मुमुक्षु, साधक, सिद्ध, योगी, वीतरागी, जोगी, जंगम, फकीर, ऋषि, मुनि, अवतार, सर्व याच मार्गाने स्वरूपस्थितिप्रत गेले आहेत असें रामदासांनी म्हटलें आहे ( क्र. ९४ ).

२०. रामदासांच्या समग्रग्रथांत "जनस्वभावगोसावी" या नांवाचें एक प्रकरण आहे. त्याकडे लोकांचें जितकें लक्ष जावे तितकें गेलेलें नाही असें दिसतें. या केवळ सत्तर ओव्याच्या प्रकरणात त्यांनी भोंदू गुरूंचे वर्णन अशा बहारीनें केलें आहे की ते जर या गुरूंनी मनांत बाळगले तर त्यांस भोंदूपणा करण्याच्या नवीन कल्पत्याच सुचावयाच्या नाहीत. मख्य, अनुभवावांचून बोलणारे हे सर्व भोंदू गुरूच होत असें रामदासांचें मत आहे. कांहीं गुरु विष्ठेचा अंगिकार करून अगर ओंगळपणाच्या सबबीनें गुरु बनतात; कांही भूतांस व वेताळांस चेतवूं शकतात; नानाप्रकारचीं चेटकें करून, स्मशानांत राहून, जिकडे तिकडे सर्पच सर्प करून, नपुंसकास वनिता भोगण्याचें सामर्थ्य देऊन, सर्व धातूंचें सोनेंरूप बनवून कांही गरूपणाप्रत पावतात; कांही गुरु आज गुप्त होऊन उद्यां उमटतात; कांही व्याघ्रावर बसून हातांत सर्पाचा चाबूक घेऊन धांवतात ( ३४ ); आणि कांहीं तर अचेतनेंच चालवितात ( ३३ ), अगर रेड्याकडून वेद बोलवितात

( ४३ ). यांत रामदासांनी चांगदेव व ज्ञानदेव याच्याबद्दलचे जे चमत्कार जगांत प्रचलित आहेत त्यांचा उल्लेख केला असावा असे दिसते. कांही दुसऱ्यांच्या जीवींचें जाणतात, व कांही वांझेचें वांझपण फेडतात; व काही तर वाळलेल्या काष्ठास पल्लवित करितात ( ४६ ). यांत रामदासांनी प्रत्यक्ष दा. १६·१ यात वाल्मिक ऋषिसंबंधी " शुष्ककाष्ठो अंकुर फुटले। तपोबळें जयाच्या " अशा प्रकारचे जे उद्गार काढिले आहेत त्याचाच उल्लेख आहे. काही गुरु गर्भिणीस कन्या अगर पुत्र होईल हे सांगतात; काही पूर्वेचे पश्चिमेस अकस्मात् जातात, जळावर आसन घालून काही परतीरास बसून जातात; काही गोसावी तर वाघच बनतात; एका गोसाव्यास वाळवंटात पुरले असताही तो जिवंत राहतो, व काही गोसावी तर मद्यमासाची फुले बनवितात ( ६१ ). या ओंवीत मोरया गोसावी यांनी जो चमत्कार केला अशी दंतकथा आहे तिचा उल्लेख असावा असें दिसते. असो. असे नानाप्रकारचे चमत्कार करणारे गुरु आहेत. पण तोच गुरु खरा की ज्यास अध्यात्मविद्या कळली ( ६८ ), व जो आत्मज्ञानपारंगत झाला ( ६९ ).

२१. रामदास इतके बुद्धिवादी होते तथापि त्याच्या अंतःकरणांत करुणेचा पाझर होता. त्यांचे अंतःकरण वज्रापेक्षां कठीण, पण कुसुमापेक्षाही मृदु होतें, हे त्यांच्या असंख्य करुणाष्टकांवरून सिद्ध होत आहे. येथे सर्व करुणाष्टके घेण्यास जागा नाही, म्हणून काही महत्त्वाचीच करुणाष्टकें तेवढी उध्दृत केली आहेत. सदासर्वदा देवाचा योग घडावा व त्याचे कारणी आपला देह पडावा (क्र.९७) असें रामदासांनी म्हटलें आहे. साधुजनाच्या संगतीनें समाधान वाटते; पण त्यांचा वियोग झाला असता दुःख होऊन काळ कंठेनासा होतो ( क्र. ९८ ); लोकामध्यें रामाचा दास या नावानें मला पाचारितात, पण अंतरांत त्याच्या भक्तीचा लेशही नाहीं ( क्र. ९९ )! संसाराकडे व प्रपंचाकडे माझें मन अद्याप ओढ घेतें ( क्र. १०० ); पळपळ आयुष्य जात असता व काळ ळळळळ विष ओकीत असतां रामावांचून या जगात-सौख्यच नाही ( क्र. १०१ ); मनासारिखी सुंदर भार्या, कन्या, जांवई, मुलें, धनधान्य, अलंकार, वसने, आरोग्य, शांततायुक्त ग्राम, साधूंची संगति, व देवाची प्राप्ति होणें, हा फार सुकृताचा योग आहे असें रामदासानीं म्हटलें आहे ( क्र. १०२ ). माझ्या अंतरीचा निश्चय घडिघडि बिघडत असल्यानें मजवर करुणेचा तूं पूर लोट ( क्र. १०३); माझ्या हातून कोणतेंही कार्य झालें नसून मी फक्त भूमिभार झालो आहे ( क्र.

१०४ ); सर्व सोडून एकदम निघून जावें असें मनास वाटतें, व उपाधीस देखून कंटाळा येतो ( क. १०५ ); विषयकर्दमांत लोळत असतां मला चिळस उपजत नाही ( क. १०६ ); मी टोणपा झालो असल्यानें मनांत फार उद्वेग वाटतो; तुला उदंड भक्त असल्याने तूं आम्हांस कशास विचारशील ( क. १०७ ); तुझ्या साधूचे कृपणपण लोकांत न दिसावें म्हणून तुझ्या सामर्थ्याचा अल्प वांटा मी मागत आहे ( क. १०८); अशा प्रकारचे रामदासाचे करुणाष्टकांतील उद्गार फार हृदयस्पर्शी आहेत. या करुणावचनावरून ज्ञान व भक्ति यांची रामदासांत किती उत्तम सांगड होती हे दिसून येईल.

२२. ज्ञान व भक्ति याबरोबरच समर्थांचा जो राजकारणांतील कर्मयोग होता तोही फार अवर्णनीय होता. रामदास हे राजकारणी नसून ते केवळ "मोक्ष-गुरु" अगर "धर्मगुरु" होते हे मत आमच्या ऐतिहासिक प्रकरणांतील उतारे जे वाचतील त्यांस सहजच सदोष वाटणार आहे. क्रमांक १०९ मध्यें रामदास हेळवाकच्या घळींतून चाफळास कसे आले, तेथें त्यांची व्याधीही कशी बरी झाली, रघुनाथभटजीवर त्यांचे प्रेम किती होतें, आपल्या शिष्यांविषयीं निकट भाव त्याचे ठायीं किती वसत होता, हे त्यांच्या स्वहस्तलिखित पत्रा-वरून सहज दृग्गोचर होणार आहे ( क. १०९ ). क्रमांक ११० वरून रामदासांनी देशोदेशीं विखुरलेल्या आपल्या निरनिराळ्या महंतांस संप्रदाय वाढविण्याविषयीं कशी आज्ञा केली होती तें व्यक्त होत आहे. "समुदाय" करणे हा त्यांच्या शिकवणीचा मुख्य धडा होता. जवळच्या सोयऱ्याधायऱ्यां-च्या मुलांस एकांतात बोलावून ईश्वराचे भजन करावें असें त्यांस सांगून जप देऊन नंतर आम्हाकडे पाठवावें म्हणजे आम्ही त्यांचा गोवा उगवून घेऊं, असें रामदासांनीं आपल्या भक्तांस सांगितलें आहे. क्रमांक १११ मध्ये सुंदरमठ अगर शिवथर येथील घळीचें रामदासांनी सुंदर वर्णन केलें आहे तें पहावें. तोच समर्थ देव की ज्यानें आपल्या शिष्यास सुद्धां समर्थ म्हणविलें. अशा देवाने सुंदरमठांत वास करून आपला दास संनिध ठेवला व सगळा प्रांतच पावन केला. या सुंदरमठाचे सौंदर्य बावी, पोखरणी, झरे इत्यादिकांनीं विशेषच वाढत आहे. ज्या कड्याकपाटांत जातांना भय वाटावें अशा स्थळीं रघुनाथाचें वैभव दृष्टीस पडतें. संनिध तर प्रतापगडची रामवरदायिनी माता आहे, असें रामदासांनीं म्हटले आहे. क्रमांक ११२ मध्यें अफझुलखानामुळें मानेना म्हणून पश्चिमेकडे जगन्माता कशी गेली, रामास वरदायिनी रामदासासही कशी वरदायिनी झाली, सदानंदामध्यें तिचा "उदो उदो" कसा झाला, अशा रीतीनें प्रतापगडच्या भवानीचें वर्णन करून आपला राजा तूंच वाढीव अशी

तीस रामदासांनी प्रार्थना केली आहे.क्रमांक११३ मध्ये शिवाजीचें देवब्राह्मणाच्या संरक्षणाबद्दल अभिनंदन करून शेवटीं उद्दंड राजकारण तटल्यामुळें तुमच्या देशांत वास्तव्य केलें असतांही तुम्ही आमचें वर्तमान घेतलें नाही याबद्दल खेद प्रदर्शित करून शिवाजीचें मन जास्तच आपल्याकडे रामदासानी ओढून घेतलें आहे. क्रमाक ११४ मध्ये क्षत्रियाचे काम म्हटलें म्हणजे मारतां मारतां मरणें हे होय; अशा शूर क्षत्रियानी तकवा न सोडितां तलवार चालविली असतां जय अवश्यमेव प्राप्त होतो; मराठा तितका मेळवून आपला महाराष्ट्रधर्म वाढविला पाहिजे; देवधर्माचें उच्छेदन झाल्यास त्यापेक्षा मृत्यु बरा असा क्षात्रधर्म सांगितला आहे.क्रमाक११५मधील सनदेत चाफळच्या स्थापनेपासून शिवाजीचा व रामदासाचा जो संबंध घडून आला त्याबद्दलचा साद्यंत इतिहास शिवाजीने लिहिला आहे हें वर सांगितलेच आहे. क्रमांक ११६मध्यें "आनंदवनभुवन" या नावाच्या प्रकरणात रामदासांनी पुढे होणार ते पाहून बायबलमधलि सेंट् जॉनप्रमाणे आपले विचार प्रकट केले आहेत. मुख्य देवच उठल्यावर इतराची किमत काय ! अभक्ताचा क्षय होऊन हिंदुस्थान बळावले आहे, औरगजेबाचें राज्य नष्ट होऊन पूर्वीप्रमाणे सुराज्य स्थापन झालें आहे, रामवरदायिनी माता हातात गर्द घेऊन रायासमागमें चालली आहे, व पूर्वीप्रमाणेच पुढेही भक्ताचे रक्षण करीत आहे, असें रामदासानी पाहिलेलें दिव्यदर्शन या आनंदवनभुवनात त्यांनी ग्रथित केले आहे. अशाप्रकारचे उद्गार वाचल्यावर रामदास राजकारणी नव्हते असें कोण म्हणेल !

**२३.** रामदासाचे गुरु कोण असा एक प्रश्न नेहमी विचारण्यांत येतो. त्याचें उत्तर रामदासानी क्रमाक ११७ मध्ये दिले आहे. त्यावरून रामचंद्राचा दृष्टात होऊन रामदासास मत्र मिळाला असावा असे दिसते. मारुतीची उपासना रामचद्रानी दृष्टांतांत सांगितल्याप्रमाणें रामदासानी केली असें त्यात लिहिलें आहे. क्रमाक ११८ मध्यें रामदासानी आपल्या पित्यास म्हणजे सूर्याजीपंतास गांवाबाहेर भीमदेवालयामध्ये रामलक्ष्मणापासून उपदेश कसा झाला, तुझे पुत्र रामदास्याचा ध्वज उभारतील असा वर त्यास कसा मिळाला, शेवटी वडिलाच्या निधनानतर ज्येष्ठ बंधूंनीं मंत्र न सांगितल्यामुळे रामदासासही त्याच देवालयांत रामाचा दृष्टांत कसा झाला, हें बालपणीचें आपलें चरित्रकथन रामदासांनी केलें आहे. क्रमाक ११९ मध्यें हनुमंतवेलीवरून राममंडपावर चढून आत्मज्ञानाचे फळ आपल्यास कसे प्राप्त झाले हे रामदासांनीं सुंदर रीतीने सांगितलें आहे. क्रमांक १२० मध्ये मनास मागे टाकणाऱ्या प्राणदात्या मारुतीची उपासना त्यांनीं सांगितली आहे. शेवटीं तेरा अक्षरी मंत्राचा तेरा कोटि जप केल्यास देवाचें दर्शन होईल असें रामदासानी अभिवचन दिलें आहे ( क्र. १२२ ).

**२४.** रामदासांचीं पदें, अभंग, वगैरे तुकारामज्ञानेश्वरांच्या इतकी जरी संख्येनें नसलीं तरी त्यांतील शिकवण ज्ञानेश्वरतुकारामांच्या प्रमाणेंच ईश्वरप्राप्ती-

ची आहे. कोणत्याही स्थितीत 'आपण राघवाची कांस सोडू नये ( क्र. १२३ ). आपण हजारो अन्याय केले तरी अनुताप झाल्यास गुरु क्षमा करतील ( क्र. १२४ ); शिंक, जांभई, खोकला इतका काळही आपण व्यर्थ जाऊ देतां कामा नये ( क्र. १२६ ); अशानें एकदम थोर लाभ होतो ( क्र. १२७ ); साधनाची खटपट व्यर्थ ठरते ( क्र. १२८ ); गृहात अगर वनात सारखेंच रामदर्शन होते ( क्र. १२९ ); एकदां रामाचें दर्शन झाल्यावर पुनः राम विन्मुख होत नाही ( क्र. १३० ), राम व विठ्ठल हे सारखेच आहेत; जसा भाव तसा देव ( क्र १३१ ); अशी शिकवण रामदासांनी आपल्या अभंगात व पदांत केली आहे.

२५. स्फुट प्रकरणांत शक्ति व युक्ति या दोन्हीखेरीज काम चालत नाही असें सांगून सर्व प्राणिमात्रांच्या शरीरांत खेळणारी विश्वव्यापिनी शक्ति, अगर भवानी माता, इला आपण हुडकून काढली असें रामदासांनी सांगितलें आहे (क्र.१३२). देव व देउळें यामधील भेद लोक मानीत नाहीत; देवळासाठीच लोक भाडतात, त्यास देव चुकवून राहतो, देव मोठा ठक असल्यानें जीर्ण देवालये तो सोडून जातो; ब्रह्मा, विष्णु महेश्वर, हे देव नसून ती देवालयेंच होत; अशा त्या निश्चल देवाचें ध्यान सर्वांनी करावें असे रामदासांनी पुनः सांगितले आहे ( क्र. १३३ ). क्रमांक १३४ हा उतारा आजपर्यंत अप्रसिद्ध होता. तो रा. शंकर श्रीकृष्ण देव व रा. गणेश गोविंद कारखानीस यांच्यामुळें आम्हांस प्रकाशित करण्यास सांपडला आहे, याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहोंत. या उताऱ्यात गुरुशिष्यसंवादरूपानें दासबोधाचा सोंलीव अर्थ दिला आहे. ईश्वरसाक्षात्काराच्या वाटेत जे नानाप्रकारचे अनुभव येतात ते यांत कल्याण व रामदास याच्या संवादांत ग्रथित केले असल्यानें या उताऱ्याचें फारच महत्त्व आहे हे सांगावयास नको. क्रमांक १३५ मध्यें ज्ञानदेवांनी "धर्म जागो निवृत्तीचा" असें जें सुंदर पद केलें आहे त्याबरहुकूम रामदासांनी "राघवाचा धर्म जागो" अशा रीतीचे पद करून देवास "मागणे निरसे जेणें। ऐसें देगा रामराया" अशा प्रकारचें एकच मागणे मागितले आहे. हें सर्व पद बहारीचें असल्यानें रामदासांच्या निष्कामभक्तीचा येथें कळसच झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाही.

२६. या ग्रंथाचे कामी रा. सा. वासुदेवराव दामले, रा. गणेश गोविंद कारखानीस, रा. शंकर केशव धर्माधिकारी, व रा. जगन्नाथ रघुनाथ लेले या सर्वांची जी मदत झाली आहे, त्याबद्दल मी त्या सर्वांचा फार आभारी आहे. आर्यभूषण छापखान्याच्या चालकांनीं फार मेहनत घेऊन व झीज सोसून हें पुस्तक छापून दिलें त्याबद्दल मी त्यांचाही फार आभारी आहें.

# अनुक्रमणिका.

# रामदासवचनामृत

## भाग पहिला.

### १. प्रासंगिक.



### २. तात्त्विक.

## ४. कर्मयोग.



## ५. उपसंहार.

# रामदासवचनामृत

## भाग दुसरा.

### ६. जुना दासबोध.

क्रमांक पृष्ठ



### ७. मनाचे श्लोक.



### ८. पंचसमासी.



### ९. मानपंचक.

## १४. ऐतिहासिक.



## १५. सांप्रदायिक.



## १६. अभंग, पदें, वगैरे.

## १७. स्फुट प्रकरणें.

# रामदासवचनामृत

(दासबोध)

## १. प्रासंगिक

### १. रामदासांचा शिवाजीस उपदेश.

वरें ईश्वर आहे साभिमानी। विशेष तुळजा भोवानी।
परंतु विचार पाहोनि। कार्ये करणें॥ ९॥

अखंडचि सावधाना। बहुत काये करावी सूचना।
परंतु कांहीं येक अनुमाना। आणिलें पाहिजे॥ १०॥

समर्थापासीं बहुत जन। राहिला पाहिजे साभिमान।
निश्चय करूनियां मन। लोक असती॥ ११॥

म्लेंच दुर्जन उदंड। बहुतां दिसांचें माजलें बंड।
या कारणें अखंड। सावधान असावें॥ १२॥

सकळकर्ता तो ईश्वरु। तेणें केला अंगिकारु।
तया पुरुषाचा विचारु। विरुळा जाणे॥ १३॥

न्यायनीति विवेक विचार। नाना प्रसंग प्रकार।
परीक्षणें परांतर। देणें ईश्वराचें॥ १४॥

महायेत्न सावधपणें। समई धारिष्ट धरणें।
अद्भुतचि कार्य करणें। देणें ईश्वराचें॥ १५॥

येश कीर्ती प्रताप महिमा। उत्तम गुणासी नाहीं सीमा।
नाहीं दुसरी उपमा। देणें ईश्वराचें ॥ १६ ॥

देव ब्राह्मण आचार विचार। कितेक जनासी आधार।
सदा घडे परोपकार। देणें ईश्वराचें ॥ १७ ॥

येहलोक परलोक पाहाणें। अखंड सावधपणें राहाणें।
बहुत जनाचें साहाणें। देणें ईश्वराचें ॥ १८ ॥

देवाचा कैपक्ष[१] घेणें। ब्राह्मणां चिंता वाहाणें।
बहुत जनासी पाळणें। देणें ईश्वराचें ॥ १९ ॥

धर्मस्थापनेचे नर। ते ईश्वराचे अवतार।
जाले आहेत पुढें होणार। देणें ईश्वराचें ॥ २० ॥

दा. १८. ६. ९–२०.

२. ब्राह्मणांच्या दुःस्थितीबद्दल रामदासांचे उद्गार.

नीच प्राणी गुरुत्व पावला। तेथें आचारचि बुडाला।
वेदशास्त्रब्राह्मणाला। कोण पुसे ॥ २९ ॥

ब्रह्मज्ञानाचा विचारु। त्याचा ब्राह्मणासीच अधिकारु।
वर्णानां ब्राह्मणो गुरुः। ऐसें वचन ॥ ३० ॥

ब्राह्मण बुद्धीपासून चेवले। आचारापासून भ्रष्टले।
गुरुत्व सांडून जाले। शिष्य शिष्यांचे ॥ ३१ ॥

कित्येक दावलमलकांस[२] जाती। कित्येक पीरास भजती।
कित्येक तुरुक होती। आपले इच्छेनें ॥ ३२ ॥

ऐसा कलियुगींचा आचार। कोठें राहिला विचार।
पुढें पुढें वर्णसंकर। होणार आहे ॥ ३३ ॥

---

१ कैवार. २ मुसलमानांचा एक अवलिया.

गुरुत्व आलें नीच याती । कांहींएक वाढली महंती ।
शूद्र आचार बुडविती । ब्राह्मणांचा ॥ ३४ ॥
हें ब्राह्मणास कळेना । त्यांची वृत्तिच वळेना ।
मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥ ३५ ॥
राज्य नेलें म्लेंछि क्षेत्रीं[1] । गुरुत्व नेलें कुपात्रीं ।
आपण अत्रीं ना परत्रीं[2] । कांहींच नाहीं ॥ ३६ ॥
ब्राह्मणास ग्रामणीनें[3] बुडाविलें । विष्णूनें श्रीवत्स मिरविलें[4] ।
त्याच विष्णूनें श्रापिलें । फरशरामें ॥ ३७ ॥
आम्हींही तेच्चि ब्राह्मण । दुःखें बोलिलें हें वचन ।
वडिल गेले ग्रामणी करून । आम्हांभोंवते ॥ ३८ ॥
आतांचे ब्राह्मणीं काय केलें । अन्न मिळेना ऐसें जालें ।
तुम्हां बहुतांचे प्रचितीस आलें । किंवा नाहीं ॥ ३९ ॥
बरें वडिलांस काय म्हणावें । ब्राह्मणांचें अदृष्ट जाणावें ।
प्रसंगें बोलिलें स्वभावें । क्षमा केलें पाहिजे ॥ ४० ॥

दा. १४. ७. २९–४०.

३. रामदासांचें स्वतःच्या उपासनेचें वर्णन.

सकळांवडिल अंतरात्मा । त्यासि नेणे तो दुरात्मा ।
दुरात्मा म्हणजे दुरी आत्मा । अंतरला तया ॥ १८ ॥
जवळी असोन चुकलें । प्रत्ययास नाहीं सोकलें ।
उगेंचि आलें आणि गेलें । देवाचकारितां ॥ १९ ॥
म्हणौन सकळां वडिल देव । त्यासी होतां अनन्यभाव ।
मग हे प्रकृतीचा स्वभाव । पालटों लागे ॥ २० ॥

---

१ क्षत्रियांनी. २ येथें ना तथें. ३ ग्रामण्यानें. ४ मिळविलें.

करी आपुला व्यासंग । कदापि नोहे ध्यानभंग ।
बोलणें चालणें वेंग[1] । पडोंच नेदी ॥ २१ ॥
जें वडिलीं निर्माण केलें । तें पाहिजे पाहिलें ।
काये काये वडिलीं केलें । किती पाहावें ॥ २२ ॥
तो वडिल जेथें चेतला[2] । तोचि भाग्यपुरुष जाला ।
अल्प चेतनें तयाला । अल्पभाग्य ॥ २३ ॥
तया नारायेणाला मनीं । अखंड आठवावें ध्यानीं ।
मग ते लक्ष्मी तयापासुनी । जाईल कोठें ॥ २४ ॥
नारायेण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।
याकारणें तोषवावी । कोणी तरी काया ॥ २५ ॥
उपासना शोधून पाहिली । तों ते विश्वपाळिती[3] जाली ।
न कळे लीळा परीक्षिली । न वचे कोणा ॥ २६ ॥
देवाची लीळा देवेंविण । आणीक दुसरा पाहे कोण ।
पाहाणें तितुकें आपण । देवाचि असे ॥ २७ ॥
उपासना सकळां ठाईं । आत्माराम कोठें नाहीं ।
याकारणें ठाइं ठाइं । रामें आटोपिलें[4] ॥ २८ ॥
ऐसी माझी उपासना । आणितां नये अनुमाना ।
नेऊनि घाली निरंजना- । पैलीकडे ॥ २९ ॥

दा. १५. ९. १८–२९.

४. रामदासांची रामभक्ति.

आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथें आमुचा परमार्थ ।
जो समर्थाचाहि समर्थ । देवां सोडविता ॥ २१ ॥

---

१ व्यंग. २ प्रकाशित जाला. ३ विश्वाचें पाळण करणारी. ४ व्यापिलें.

त्याचे आम्हीं सेवकजनें। सेवेकरितां जालें ज्ञान।
तथें अभावें[1] धरितां पतन। पाविजेल कीं॥ २२॥

गुरु सांगती सारासार। त्यास कैसें म्हणावें असार।
तुज काय सांगणें विचार। शाहाणे जाणती॥ २३॥

समर्थाचे मनींचें तुटे। तेंचि जाणावें अदृष्ट खोटें।
राज्यपदापासून करंटे। चेवले[2] जैसे॥ २४॥

मी थोर वाटे मनीं। तो नव्हे ब्रह्मज्ञानी।
विचार पाहतां देहाभिमानी। प्रत्यक्ष दिसे॥ २५॥

वस्तुभजन करीना। ना न करी ऐसेंही म्हणेना।
तरी हे जाणावी कल्पना। दडोन राहिली॥ २६॥

ना तें ज्ञान ना तें भजन। उगाचि आला देहाभिमान।
येथें नाहीं किं अनुमान। प्रत्यय तुझा॥ २७॥

तरी आतां ऐसें न करावें। रघुनाथभजनीं लागावें।
तेणेंचि ज्ञान बोलावें। चळेना ऐसें॥ २८॥

करी दुर्जनाचा संहार। भक्तजनासी आधार।
ऐसा हा तों चमत्कार। रोकडा[3] चाले॥ २९॥

मनीं धरावें तें होतें। विघ्न अवघेंचि नासोन जातें।
कृपा केलियां रघुनाथें। प्रचित येते॥ ३०॥
रघुनाथभजनें ज्ञान झालें। रघुनाथभजनें महत्त्व वाढलें।
म्हणौनियां तुवां केलें। पाहिजे आधीं॥ ३१॥

हें तों आहे सप्रचित। आणि तुज वाटेना प्रचित।
साक्षात्कारें नेमस्त। प्रत्ययो करावा॥ ३२॥

---

१ अविश्वास. २ च्युत झालें. ३ प्रत्यक्ष, रोखठोक.

रघुनाथ स्मरोनि कार्य करावें। तें तात्काळचि सिद्धी पावे।
कर्ता राम हें असावें। अभ्यांतरीं ॥ ३३ ॥

कर्ता राम मी नव्हे आपण। ऐसें सगुणनिवेदन।
निर्गुणीं तें अनन्य। निर्गुणचि होइजे ॥ ३४ ॥

मी कर्ता ऐसें म्हणतां। कांहींच घडेना सर्वथा।
प्रचित पाहासी तरी आतां। सीघ्रचि पाहे ॥ ३५ ॥

मी कर्ता ऐसें म्हणसी। तेणें तूं कष्टी होसी।
राम कर्ता म्हणतां पावसी। येश कीर्ती प्रताप ॥ ३६ ॥

दा. ६. ७. २१–३६.

## २. तात्त्विक

### १. ज्ञानाचें व्यतिरेकात्मक वर्णन.

भूत भविष्य वर्तमान। ठाउकें आहे परिच्छिन्न[1]।
यासीहि म्हणिजे तें ज्ञान। परी तें ज्ञान नव्हे ॥ ३ ॥

बहुत केलें विद्यापठण। संगीत शास्त्र रागज्ञान।
वैदिक शास्त्र वेदाधेनें[2]। हेंही ज्ञान नव्हे ॥ ४ ॥

नाना वनितांची परीक्षा। नाना मनुष्यांची परीक्षा।
नाना नरांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ६ ॥

नाना अश्वांची परीक्षा। नाना गजांची परीक्षा।
नाना श्वापदांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ७ ॥

---

१ संपूर्ण. २ अधेन = अध्ययन.

नाना पशूंची परीक्षा । नाना पक्षांची परीक्षा ।
नाना भूतांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ ८ ॥
नाना यानांची परीक्षा । नाना वस्त्रांची परीक्षा ।
नाना शस्त्रांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ ९ ॥
नाना धातूंची परीक्षा । नाना नाण्यांची परीक्षा ।
नाना रत्नांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १० ॥
नाना पाषाण परीक्षा । नाना काष्ठांची परीक्षा ।
नाना वाद्यांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ ११ ॥
नाना पुष्पांची परीक्षा । नाना फळांची परीक्षा ।
नाना वल्लींची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १४ ॥
नाना दुःखांची परीक्षा । नाना रोगांची परीक्षा ।
नाना चिन्हांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १५ ॥
नाना मंत्रांची परीक्षा । नाना यंत्रांची परीक्षा ।
नाना मूर्तींची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १६ ॥
नाना क्षेत्रांची परीक्षा । नाना गृहांची परीक्षा ।
नाना पात्रांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १७ ॥
नाना होणार परीक्षा । नाना समयांची परीक्षा ।
नाना तर्कांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १८ ॥
नाना शब्दांची परीक्षा । नाना अर्थांची परीक्षा ।
नाना भाषांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २१ ॥
नाना मतांची परीक्षा । नाना ज्ञातांची परीक्षा ।
नाना वृत्तींची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २३ ॥
नाना रूपांची परीक्षा । नाना रसनेची परीक्षा ।
नाना सुगंध परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २४ ॥

नेमकचि बोलणें । तत्काळचि प्रतिवचन देणें ॥
सीघ्रचि कवित्व करणें । हें ज्ञान नव्हे ॥ २६ ॥

नेत्रपालवी नादकळा । करपालवी भेदकळा ।
स्वरपालवी संकेतकळा । हें ज्ञान नव्हे ॥ २७ ॥

काव्यकुशळ संगीतकळा । गीतप्रबंध नृत्यकळा ।
सभाचातुर्य शब्दकळा । हें ज्ञान नव्हे ॥ २८ ॥

नाना लाघवें चित्रकळा । नाना वाद्यें संगीत कळा ।
नाना प्रकारें विचित्र कळा । हें ज्ञान नव्हे ॥ ३० ॥

आदिकरूनि चौसष्टि कळा । याहि वेगळ्या नाना कळा ।
चौदा विद्या सिद्धि कळा । हें ज्ञान नव्हे ॥ ३१ ॥

असो सकळ कळाप्रवीण । विद्यामात्रपरिपूर्ण ।
तरी ते कौशल्यता परी ज्ञान । ह्मणोंचि नये ॥ ३२ ॥

हें ज्ञान होयसें भासे । परंतु मुख्य ज्ञान तें अनारिसें[1] ।
जेथें प्रकृतीचें पिसें[2] । समूळ वावें[3] ॥ ३३ ॥

जाणावें दुसऱ्याचें जीवींचें । हें ज्ञान वाटे साचें ।
परंतु हें आत्मज्ञानाचें । लक्षण नव्हे ॥ ३४ ॥

माहानुभाव महाभला । मानसपूजा करितां चुकला ।
कोणी येकें पाचारिला । ऐसें नव्हे म्हणोनि ॥ ३५ ॥

ऐसी जाणे अंतरस्थिती । तयासी परमज्ञाता म्हणती ।
परंतु जेणें मोक्षप्राप्ती । तें हें ज्ञान नव्हे ॥ ३६ ॥

बहुत प्रकारीचीं ज्ञानें । सांगों जातां असाधारणें ।
सायोज्यप्राप्ती होये जेणें । तें ज्ञान वेगळें ॥ ३७ ॥

दा. ५. ५. ३–३७.

---

१ वेगळें. २ वेड. ३ व्यर्थ.

## ६. ज्ञान म्हणजे काय ?

ऐक ज्ञानाचें लक्षण। ज्ञान म्हणिज आत्मज्ञान।
पाहावें आपणासि आपण। या नाव ज्ञान ॥ १ ॥
मुख्य देवास जाणावें। सत्यस्वरूप वोळखावें।
नित्यानित्य विचारावें। या नाव ज्ञान ॥ २ ॥
जेथें दृश्यप्रकृति सरे। पंचभूातक वोसरे।
समूळ द्वैत निवारे। या नाव ज्ञान ॥ ३ ॥
मनबुद्धिअगोचर। न चले तर्काचा विचार।
उलेखं[1] परेहूनि पर। या नाव ज्ञान ॥ ४ ॥
जेथें नाहीं दृश्यभान। जेथें जाणीव हें अज्ञान।
विमळ शुद्ध स्वरूपज्ञान। यासि बोलिजे ॥ ५ ॥
सर्वसाक्षी अवस्ता तुर्या[2]। ज्ञान ऐसें म्हणती तया।
परी तें जाणिजें वायां। पदार्थज्ञान ॥ ६ ॥
दृश्य पदार्थ जाणिजे। त्यास पदार्थज्ञान बोलिजे।
शुद्धस्वरूप जाणिजे। या नाव स्वरूपज्ञान ॥ ७ ॥
जेथें सर्वचि नाहीं ठाईचें[3]। तेथें सर्वसाक्षित्व कैंचें।
म्हणौनि शुद्ध ज्ञान तुर्येचें। मानूंचि नये ॥ ८ ॥
ज्ञान म्हणजे अद्वैत। तुर्या प्रत्यक्ष द्वैत।
म्हणौनि शुद्ध ज्ञान तें संतत[4]। वेगळेंचि असे ॥ ९ ॥
ऐक शुद्ध ज्ञानाचें लक्षण। शुद्ध स्वरूपचि आपण।
या नाव शुद्ध स्वरूपज्ञान। जाणिजे श्रोतीं ॥ १० ॥
माहावाक्य उपदेश भला। परी त्याचा जप नाहीं बोलिला।
तेथींचा तो विचारचि केला। पाहिजे साधकें ॥ ११ ॥

१ उल्लेख, निर्देश. २ चतुर्थावस्था. ३ सत्य. ४ स्वतन्त्र, अगर नेहमी.

माहावाक्य उपदेशसार । परी घेतला पाहिजे विचार ।
त्याच्या जपें अंधकार । न फिटे भ्रांतीचा ॥ १२ ॥
माहावाक्याचा अर्थ घेतां । आपण वस्तुचि तत्त्वतां ।
त्याचा जप करितां वृथा । सीणचि होये ॥ १३ ॥
माहावाक्याचें विवरण । हें मुख्य ज्ञानाचें लक्षण ।
शुद्ध लक्ष्यांशें आपण । वस्तुच आहे ॥ १४ ॥
आपला आपणासि लाभ । हें ज्ञान परम दुल्लभ[1] ।
जें आदिअंतीं स्वयंभ । स्वरूपचि स्वयें ॥ १५ ॥
जेथून हें सर्वही प्रगटे । आणी सकळही जेथें आटे ।
तें ज्ञान जालियां फिटे । भ्रांति बंधनाची ॥ १६ ॥
मतें आणि मतांतरें । जेथें होती निर्विकारें ।
अति सूक्ष्म विचारें । पाहातां ऐक्य ॥ १७ ॥
जें या चराचराचें मूळ । शुद्धं स्वरूप निर्मळ ।
या नाव ज्ञान केवळ । वेदांतमतें ॥ १८ ॥
शोधितां आपलें मूळस्थान । सहजचि उडे अज्ञान ।
या नाव म्हणिजे ब्रह्मज्ञान । मोक्षदायेक ॥ १९ ॥
आपणासि वोळखों जातां । आंगीं बाणे सर्वज्ञता ।
तेणें एकदेसी वार्ता । निशेष उडे ॥ २० ॥
मी कोण ऐसा हेत । धरून पाहातां देहातीत ।
अवलोकितां नेमस्त । स्वरूपचि होये ॥ २१ ॥
असो पूर्वी थोर थोर । जेणें ज्ञानें पैलपार ।
पावले ते साचार । ऐक आतां ॥ २२ ॥

---

१ दुर्लभ.

व्यास वसिष्ठ महामुनी । शुकनारद समाधानी ।
जनकादिक महाज्ञानी । येणेंचि ज्ञानें ॥ २३ ॥

वामदेवादिक योगेश्वर । वाल्मीक अत्रि ऋषेश्वर ।
शौनिकादि अध्यात्मसार । वेदांतमतें ॥ २४ ॥

सनकादिक मुख्य करूनी । आदिनाथ मीन गोरक्षमुनी ।
आणीक बोलतां वचनीं । अगाध[1] असती ॥ २५ ॥

सिद्ध मुनी माहानुभाव । सकळांचा जो अंतभाव ।
जेणें सुखें माहादेव । डुल्लत सदा ॥ २६ ॥

जें वेदशास्त्रांचें सार । सिद्धांत धादांत[2] विचार ।
ज्याची प्राप्ती भाग्यानुसार । भाविकांस होये ॥ २७ ॥

साधुसंत आणी सज्जन । भूत भविष्य वर्तमान ।
सर्वत्रांचें गुह्यज्ञान । तें सांगिजेल आतां ॥ २८ ॥

तीर्थे व्रतें तपें दानें । जें न जोडे धूम्रपानें ।
पंचाग्नी गोरांजनें[3] । जें प्राप्त नव्हे ॥ २९ ॥

सकळ साधनांचें फळ । ज्ञानाची सिर्ग[4]ची केवळ ।
जेणें संशयाचें मूळ । निशेष तुटे ॥ ३० ॥

छपन्न भाषा तितुके ग्रंथ । आदिकरून वेदांत ।
या इतुकियांचा गहनार्थ । येकचि आहे ॥ ३१ ॥

जे नेणवे पुराणीं । जेथें सिणल्या वेदवाणी ।
तेंचि आतां येचि क्षणीं । बोधीन गुरुकृपें ॥ ३२ ॥

पाहिलें नस्तां संस्कृतीं । रीग[5] नाहीं मऱ्हाष्ट ग्रंथीं ।
हृदईं वसल्या कृपामूर्ती । सद्गुरु स्वामी ॥ ३३ ॥

---

१ कित्येक. २ आत्मसाक्षात्कार. ३ एक प्रकारचें अग्निसाधन. ४ शेवट. ५ प्रवेश.

आतां नलगे संस्कृत । अथवा ग्रंथ प्राकृत ।
माझा स्वामी कृपेसहित । हृदईं वसे ॥ ३४ ॥

न करितां वेदाभ्यास । अथवा श्रवण सायास ।
प्रेत्नेविण सौरसं[1] । सद्गुरुकृपा ॥ ३५ ॥

ग्रंथ मात्र मऱ्हाष्ट । त्याहून संस्कृत श्रेष्ठ ।
त्या संस्कृतामधें पष्ट[2] । थोर तो वेदांत ॥ ३६ ॥

त्या वेदांतापरतें कांहीं । सर्वथा श्रेष्ठ नाहीं ।
जेथें वेदगर्भ सर्वही । प्रगट जाला ॥ ३७ ॥

असो ऐसा जो वेदांत । त्या वेदांताचाही मथितार्थ ।
अतिगहन जो परमार्थ । तो तूं ऐक आतां ॥ ३८ ॥

अरे गहनाचेंहि गहन । तें तूं जाण सद्गुरुवचन ।
सद्गुरुवचनें समाधान । नेमस्त आहे ॥ ३९ ॥

सद्गुरुवचन तोचि वेदांत । सद्गुरुवचन तोचि सिद्धांत ।
सद्गुरुवचन तोचि धादांत । सप्रचीत आतां ॥ ४० ॥

जें अत्यंत गहन । माझ्या स्वामीचें वचन ।
जेणें माझें समाधान । अत्यंत जालें ॥ ४१ ॥

तें हें माझें जिवीचें गुज । मी सांगेन म्हणतों तुज ।
जरी अवधान देसी मज । तरी आतां येच क्षणीं ॥ ४२ ॥

शिष्य म्लान वदनें बोले । धरिले सद्दढ पाउले ।
मग बोलों आरंभिलें । गुरुदेवें ॥ ४३ ॥

अहं ब्रह्मास्मि माहावाक्य । येथीचा अर्थ अतर्क्य ।
तोही सांगतों ऐक्य । गुरुशिष्य जेथें ॥ ४४ ॥

---

१ सुलभ. २ स्पष्ट.

ऐक शिष्या येथीचें वर्म । स्वयें तूंचि आहेसी ब्रह्म ।
येविषईं संदेह भ्रम । धरूंचि नको ॥ ४५ ॥
नवविधा प्रकारें भजन । त्यांत मुख्य तें आत्मनिवेदन ।
तें समग्रप्रकारें कथन । कीजेल आतां ॥ ४६ ॥
निर्माण पंचभूतें यीयें[1] । कल्पांतीं नासतीं येथान्वयें ।
प्रकृति पुरुष जियें । तेही ब्रह्म होतीं ॥ ४७ ॥
दृश्य पदार्थ आटतां । आपणाहि नुरे तत्वतां ।
ऐक्यरूपें ऐक्यता । मुळींच आहे ॥ ४८ ॥
सृष्टीची नाहीं वार्ता । तेथें मुळींच ऐक्यता ।
पिंडब्रह्मांड पाहों जातां । दिसेल कोठें ॥ ४९ ॥
ज्ञानवन्ही प्रगटे । तेणें दृश्य केरें आटे ।
तदाकारें मूळ तुटे । भिन्नत्वाचें ॥ ५० ॥
मिथ्यत्वें वृत्ति फिरे । तों दृश्य असतांच ओसरे ।
सहजचि येणेंप्रकारें । जालें आत्मनिवेदन ॥ ५१ ॥
असो गुरूचे ठाईं अनन्यता । तरी तुजसी कायेसी रे[1] चिंता ।
वेगळेपणें अभक्ता । उरोंचि नको ॥ ५२ ॥
आतां हेंचि दृढीकर्ण । व्हावया करीं सद्गुरुभजन ।
सद्गुरुभजनें समाधान । नेमस्त आहे ॥ ५३ ॥
या नाव शिष्या आत्मज्ञान । येणें पाविजे समाधान ।
भवभयाचें बंधन । समूळ मिथ्या ॥ ५४ ॥
देह मी वाटे ज्या नरा । तो जाणावा आत्महत्यारा ।
देहाभिमानें येरझारा । भोगिल्याच भोगी ॥ ५५ ॥
असो चहूं देहावेगळा । जन्मकर्मासी निराळा ।
सकळ आबाळगोबळां[2] । सबाह्य[4] तूं ॥ ५६ ॥

१ इयें, हीं. २ कस्पटासमान, तुच्छ. ३ गबाळा. ४ बाहेर.

कोणासीच नाहीं बंधन । भ्रांतिस्तव भुलले जन ।
दृढ घेतला देहाभिमान । म्हणौनियां ॥ ५७ ॥
शिष्या येकांतीं बैसावें । स्वरूपीं विश्रांतीस जावें ।
तेणें गुणें दृढावे । परमार्थ हा ॥ ५८ ॥
अखंड घडे श्रवण मनन । तरीच पाविजे समाधान ।
पूर्ण जालिया ब्रह्मज्ञान । वैराग्य भरे आंगीं ॥ ५९ ॥
शिष्या मुक्तपणें अनर्गळें[1] । करिसी इंद्रियें वाष्कळ ।
तेणें तुझी तळमळ । जाणार नाहीं ॥ ६० ॥
विषईं वैराग्य उपजलें । तयासीच पूर्ण ज्ञान जालें ।
मणी टाकितांची लाधलें । राज्य जेवीं ॥ ६१ ॥
मणी होतां सीगटाचा[2] । लोभ धरूनियां तयाचा ।
मूर्खपणें राज्याचा । अव्हेर केला ॥ ६२ ॥
ऐक शिष्या सावधान । आतां भविष्य मी सांगेन ।
जया पुरुषास जें ध्यान । तयास तेंचि प्राप्त ॥ ६३ ॥
म्हणोनि जे अविद्या । सांडून धरावी सुविद्या ।
तेणें गुणें जगद्वंद्या । पाविजे सीघ्र ॥ ६४ ॥

दा. ५. ६. १–६४.

७. आत्मज्ञानाच्या योगानें सर्व पातकांचा व दुःखांचा नाश होतो.

पापाचें वळलें[3] शरीर । पापाचि घडे तदनंतर ।
अंतरीं रोग वरिवरी उपचार । काय करी ॥ ५९ ॥
नाना क्षेत्रीं हें मुंडिलें । नाना तीर्थीं हें दंडिलें ।
नाना निग्रहीं खंडिलें । ठाईं ठाईं ॥ ६० ॥

१ अनिर्बद्ध. २ शिंगाचा. ३ घडलें.

नाना मृत्तिकेनें घांसिलें । अथवा तप्तमुद्रेनें लांसिलें ।
जरी हें वरिवरी तासिलें । तरी शुद्ध नव्हे ॥ ६१ ॥
सेणाचे गोळे गिळिले । गोमुत्राचे मोघे घेतले ।
माळा रुद्राक्ष घातले । काष्ठमणी ॥ ६२ ॥
वेश वरीवरी केला । परी अंतरीं दोष भरला ॥
त्या दोषाच्या दहनाला । आत्मज्ञान पाहिजे ॥ ६३ ॥
नाना व्रतें नाना दानें । नाना योग तीर्थाटणें ।
सर्वांहून कोटिगुणें । महिमा आत्मज्ञानाचा ॥ ६४ ॥
आत्मज्ञान पाहे सदा । त्याच्या पुण्यासी नाहीं मर्यादा ।
दुष्ट पातकाची बाधा । निरसोन गेली ॥ ६५ ॥
वेदशास्त्रीं सत्यस्वरूप । तेंचि ज्ञानियाचें रूप ।
पुण्य जालें अमूप[2] । सुकृतें सीमा सांडिली ॥ ६६ ॥
या प्रचितीच्या गोष्टी । प्रचित पहावी आत्मदृष्टी ।
प्रचिती वेगळें कष्टी । होऊंच नये ॥ ६७ ॥
आगा ये प्रचितीचे लोक हो । प्रचित नस्तां अवघा शोक हो ।
रघुनाथकृपेनें राहो । प्रत्यय निश्चयाचा ॥ ६८ ॥

दा. १०. १०. ५९–६८.

## ८. मूर्ति म्हणजे देव नव्हे.

पाषाणाचा देव केला । एके दिवशीं भंगोन[1] गेला ।
तेणें भक्त दुःखवला । रडे पडे आक्रंदे ॥ ३३ ॥
देव हारपला घरीं । येक देव नेला चोरीं ।
येक देव दुराचारीं । फोडिला बळें ॥ ३४ ॥

१ भाजलें, डागलें. २ अमर्याद.

येक देव जापाणिला[1] । येक देव उदकीं टाकिला ।
येक देव नेऊन घातला । पायातळीं ॥ ३५ ॥

काय सांगों तीर्थमहिमा । मोडूनि गेला दुरात्मा ।
थोर सत्व होतें तें मा[2] । काय जालें कळेना ॥ ३६ ॥

देव घडिला सोनारीं । देव वोतिला वोतारीं ।
येक देव घडिला पाथरीं । पाषाणाचा ॥ ३७ ॥

नर्बदागंडिकातीरीं । देव पडिले लक्षवरी ।
त्यांची संख्या कोण करी । असंख्यात गोटे ॥ ३८ ॥

चक्रतीर्थीं चक्रांकित । देव असती असंख्यात ।
नाहीं मनीं निश्चितार्थ । येक देव ॥ ३९ ॥

बाण तांदळे तांब्रनाणें । स्फटिक देव्हारां पूजणें ।
ऐसे देव कोण जाणें । खरे किं खोटे ॥ ४० ॥

देव रेसिमाचा केला । तोही तुटोनियां गेला ।
आतां नवा नेम धरिला । मृत्तिकेचा ॥ ४१ ॥

आमचा देव बहु सत्य । आम्हां आकांतीं पावत ।
पूर्ण करी मनोरथ । सर्वकाळ ॥ ४२ ॥

आतां याचें सत्व गेलें । प्राप्त होतें तें जालें ।
प्राप्त न वचे पालटिले । ईश्वराचेनि ॥ ४३ ॥

धातु पाषाण मृत्तिका । चित्रलेप काष्ठ देखा ।
तेथें देव कैंचा मूर्खा । भ्रांति पडिली ॥ ४४ ॥

हे आपुली कल्पना । प्राप्तऐसीं फळें जाणा ।
परी त्या देवाचिया खुणा । वेगळ्याची ॥ ४५ ॥

दा. ६. ६. ३३-४५.

---

१ भ्रष्टविला. २ मग.

## ९. नाना देव आणि एक देव.

लोक कोण्या पंथें जाती । आणि कोण्या देवास भजती ।
ऐसी हे रोकडी प्रचीती । सावध ऐका ॥ २८ ॥
मृत्तिका धातु पाषाणादिक । ऐसीया प्रतिमा अनेक ।
बहुतेक लोकांचा दंडक[1] । प्रतिमादेवीं ॥ २९ ॥
नाना देवांचे अवतार । चरित्रें ऐकती येक नर ।
जपध्यान निरंतर । करिती पूजा ॥ ३० ॥
येक सकळांचा अंतरात्मा । विश्वीं वर्ते जो विश्वात्मा ।
द्रष्टा साक्षी ज्ञानात्मा । मानिती येक ॥ ३१ ॥
येक ते निर्मळ निश्चळ । कदापी नव्हेती चंचळ ।
अनन्यभावें केवळ । वस्तुच ते ॥ ३२ ॥
येक नाना प्रतिमा । दुसरा अवतारमहिमा ।
तिसरा तो अंतरात्मा । चौथा तो निर्विकारी ॥ ३३ ॥
ऐसे हे चत्वार देव । सृष्टीमधील स्वभाव ।
या वेगळा अंतर्भाव । कोठेंचि नाहीं ॥ ३४ ॥
अवघे येकचि मानिती । ते साक्ष देव जाणती ।
परंतु अष्टधा प्रकृति । वोळखिली पाहिजे ॥ ३५ ॥
प्रकृतीमधील देव । तो प्रकृतीचा स्वभाव ।
भावातीत माहानभाव । विवेकें जाणावा ॥ ३६ ॥
जो निर्मळास ध्याईल । तो निर्मळचि होईल ।
जो जयास भजेल । तो तद्रूप जाणावा ॥ ३७ ॥
क्षीर नीर निवडिती । ते राजहंस बोलिजेती ।
सारासार जाणती । ते माहानभाव ॥ ३८ ॥

१ प्रचार.

अरे जो चंचळासि ध्याईल । तो सहजचि चळेल ।
जो निश्चळास भजेल । तो निश्चळचि ॥ ३९ ॥

दा. ११. २. २८–३९.

## १०. खरा देव म्हणजे मूर्ति नव्हे.

मृत्तिकापूजन करावें । आणि सवेंचि विसर्जावें ।
हें मानेना स्वभावें । अंतःकर्णासी ॥ १ ॥

देव पूजावा आणी टाकावा । हें प्रशस्त न वटे[2] जीवा ।
याचा विचार पाहावा । अंतर्यामीं ॥ २ ॥

देव करिजे ऐसा नाहीं । देव टाकिजे ऐसा नाहीं ।
म्हणोनि याचा कांहीं । विचार पाहावा ॥ ३ ॥

देव नाना शरीरें धरितो । धरूनी मागुती सोडितो ।
तरी तो देव कैसा आहे तो । विवेकें वोळखावा ॥ ४ ॥

सगट[3] लोकांचे अंतरींचा भाव । मज प्रत्यक्ष भेटवावा देव[4] ।
परंतु विवेकाचा उपाव । वेगळाचि आहे ॥ ७ ॥

विचार पाहातां तगेना । त्यांस देव ऐसें म्हणवेना ।
परंतु जन राहेना । काय करावें ॥ ८ ॥

थोर लोक मरोनि जाती । त्यांच्या सुरता[5] करूनि पाहाती ।
तैसीच आहे हेही गती । उपासनेची ॥ ९ ॥

थोर व्यापार ठाकेना जनीं । म्हणोनि केली रखतवानी[6] ।
राजसंपदा तयाचेनी । प्राप्त कैची ॥ १० ॥

म्हणोनि जितुका भोळा भाव । तितुका अज्ञानाचा स्वभाव ।
अज्ञानें तरी देवाधिदेव । पाविजेल कैंचा ॥ ११ ॥

---

१ लगेच. २ वाटे. ३ सर्व. ४ प्रतिमा. ५ मिळेना. ६ शाईचा व्यापार.

माया उल्लंघाया कारणें । देवासी नाना उपाय करणें ।
अध्यात्मश्रवणपंथेंचि जाणें । प्रत्ययानें ॥ १४ ॥
खोटें तें खोटेंचि खोटें । खऱ्यासी तगेनात बाष्टें[1] ।
मन अधोमुख उफराटें । केलें पाहिजे ॥ १७ ॥
अध्यात्मश्रवण करीत जावें । म्हणिजे सकळ कांहीं फावे ।
नाना प्रकारींचे गोवे । तुटोनि जाती ॥ १८ ॥
पिंड पडतां अवघेंचि जातें । परंतु परब्रह्म राहातें ।
शाश्वत समजोन मग तें । दृढ धरावें ॥ ३० ॥

दा. २०. ९. १–३०.

११. देवांचा जो देव तो गुरूच्या योगानें कळतो.

मातीचे देव धोंड्याचे देव । सोन्याचे देव रुप्याचे देव ।
काशाचे देव पितळेचे देव । तांब्याचे देव चित्रलेपें[2] ॥ १ ॥
रुविच्या लांकडाचे देव पोंवळ्यांचे देव । बाण तांदळे नर्मदे देव ।
शालिग्राम काश्मिरी देव । सूर्यकांत सोमकांत ॥ २ ॥
तांब्रनाणीं हेमनाणीं । कोणी पूजिती देवार्चनीं ।
चक्रांकित चक्रतीर्थीहुनी । घेऊन येती ॥ ३ ॥
मुळीं द्रष्टा देव तो येक । त्याचे जाहाले अनेक ।
समजोन पाहातां विवेक । उमजों लागे ॥ ६ ॥
लोकांची पाहातां रीती । लोक देवार्चनें करिती ।
अथवा क्षेत्रदेवें[3] पाहाती । ठाईं ठाईं ॥ १८ ॥
अथवा नाना अवतार । ऐकोन धरिती निर्धार ।
परी ते अवघे सविस्तर । होऊन गेले ॥ १९ ॥

---

१ आरोप. २ भिंतीवरचीं चित्रें. ३ क्षेत्रांतील देव.

येक ब्रह्मविष्णुमहेश । ऐकोन ह्मणती हे विशेष ।
गुणातीत जो जगदीश । तो पाहिला पाहिजे ॥ २० ॥

देवासि नाहीं थानमान[1] । कोठें करावें भजन ।
हा विचार पाहातां अनुमान । होत जातो ॥ २१ ॥

भूमंडळीं देव नाना । त्यांची भीड उलंघेना ।
मुख्य देव तो कळेना । कांहीं केल्या ॥ २३ ॥

हें ज्ञानदृष्टीनें पाहावें । पाहोन तेथेंचि राहावें ।
निजध्यासें तद्रूप व्हावें । संगत्यागें ॥ २८ ॥

ऐसी सूक्ष्म स्थितिगती । कळतां चुके अधोगती ।
सद्गुरुचेनि सद्गती । तात्काळ होते ॥ ३० ॥

दा. १९. ५. १–३०.

१२. अंतरात्मा सर्व देवांहून श्रेष्ठ आहे.

ब्रह्म निराकार निश्चळ । आत्म्यास विकार चंचळ ।
तयास म्हणती सकळ । देव ऐसें ॥ १ ॥

देवाचा ठावाचि लागेना । येक देव नेमस्त कळेना ।
बहुत देवीं अनुमानेना । येक देव ॥ २ ॥

म्हणोनि विचार असावा । विचारें देव शोधावा ।
बहुत देवांचा गोवा[2] । पडोंचि नये ॥ ३ ॥

देव क्षेत्रीं पाहिला । त्यासारिखा धातूचा केला ।
पृथ्वीमधें दंडक चालिला । येणें रीती ॥ ४ ॥

नाना प्रतिमादेवांचें मूळ । तो हा क्षत्रदेवचि केवळ ।
नाना क्षत्रें भूमंडळ । शोधून पाहावें ॥ ५ ॥

---

१ स्थान अथवा प्रमाण. २ गुंता.

क्षत्रदेव[1] पाषाणाचा । विचार पाहातां तयाचा ।
तंत[2] लागला मुळाचा । अवताराकडे ॥ ६ ॥
अवतारी देव संपले । देहे धरून वर्तों लागले ।
त्याहून थोर अनुमानले । ब्रह्मा विष्णु महेश ॥ ७ ॥
त्यां तिही देवांस ज्याची सत्ता । तो अंतरात्माचि पाहातां ।
कर्ता भोक्ता तत्त्वतां । प्रत्यक्ष आहे ॥ ८ ॥
युगानयुगें तिन्ही लोक । येकचि चालवी अनेक ।
हा निश्चयाचा विवेक । वेदशास्त्रीं पाहावा ॥ ९ ॥
आत्मा वर्तवितो शरीर । तोचि देव उत्तरोत्तर ।
जाणीवरूपें कळिवर । विवेकें वर्तवी ॥ १० ॥
तो अंतर्देव चुकती । धांवा घेऊन तीर्था जाती ।
प्राणी बापुडे कष्टती । देवास नेणतां ॥ ११ ॥
मग विचारिती अंतःकरणीं । जेथें तेथें धोंडा पाणी ।
उगेंचि वणवण हिंडोनि । कायें होतें ॥ १२ ॥
ऐसा ज्यासी विचार कळला । तेणें सत्संग धरिला ।
सत्संगें देव सांपडला । बहुत जनासी ॥ १३ ॥

दा. १८. ८. १–१३.

## १३. आत्मा हा सर्व देवांहून श्रेष्ठ आहे.

सकळ देवांचें मूळ । तो हा अंतरात्माचि केवळ ।
भूमंडळीं भोग सकळ । त्यासीच घडे ॥ १६ ॥
नाना देव होऊन बैसला । नाना शक्तिरूपें जाला ।
भोक्ता सकळ वैभवाला । तोचि येक ॥ १७ ॥

---

१ क्षत्रांतील देव. २ तंतु.

याचा पाहातां विचार । उदंड लांबला जोजार[1] ।
होती जाती देव नर । किती म्हणोनि ॥ १८ ॥

कीर्ति आणि अपकीर्ति । उदंड निंदा उदंड स्तुती ।
सर्वत्रांची भोगप्राप्ती । अंतरात्म्यासीच घडे ॥ १९ ॥

कोण देहीं काये करितो । कोण देहीं काये भोगितो ।
भोगी त्यागी वीतरागी तो । येकचि आत्मा ॥ २० ॥

प्राणी साभिमानें भुलले । देहाकडे पाहात गेले ।
मुख्य अंतरात्म्यास चुकले । अंतरीं असोनि ॥ २१ ॥

आरे या आत्मयांची चळवळ पाहे । ऐसा भूमंडळीं कोण आहे ।
अगाध पुण्यें अनुसंधान राहे । कांहीं येक ॥ २२ ॥

त्या अनुसंधानासारिसें । जळोनि जाइजे किल्मिषें ।
अंतरनिष्ठ ज्ञानी ऐसें । विवरोन पाहाती ॥ २३ ॥

अंतरनिष्ठ तितुके तरले । अंतरभ्रष्ट तितुके बुडाले ।
बाह्यात्कारें भरंगळले[2] । लोकाचारें ॥ २४ ॥

दा. १८. १. १६–२४.

## १४ देवता व भुतें यांचें आस्तित्व.

कित्येक प्राणी निःशेष मरती । पुन्हां मागुतें जीव येती ।
ढकलून दिल्हें तेणें दुःखवती । हस्तपादादिक ॥ ६ ॥

सर्पदृष्टि जालियावरि । ती दिवसां उठवी धन्वंतरी ।
तेव्हां ते माघारी । वासना येते कीं ॥ ७ ॥

कित्येक सेवें[3] होऊन पडती । कित्येक तयास उठविती
येमलोकींहून आणविती । माघारे प्राणी ॥ ८ ॥

१ विस्तार २ भरकटले, फसले. ३ शवें.

कित्येक पूर्वीं श्रापिले । ते शापें देह पावले ।
उश्रापकाळीं पुन्हां आले । पूर्वदेहीं ॥ ९ ॥
कित्येकीं बहुजन्म घेतले । कित्येक परकाया प्रवेशले ।
ऐसे आले आणि गेले । बहुत लोक ॥ १० ॥

दा. ९. ८. ९–१०.

वायोरूपें देवतें भुतें । अंगीं भरतीं अकस्मातें ।
वीधें[1] केलियां प्रेतें । सावध होतीं ॥ २० ॥
राहाणें ब्राह्मण समंध जाती । राहाणें ठेवणीं सापडती ।
नाना गुंतले[2] उगवती । प्रत्यक्ष राहाणें ॥ २१ ॥

दा. ९. ८. २०–२१.

वायोकरितां रागोद्धार । कळे वोळखीचा निर्धार ।
दीप लागे मेघ पडे हा चमत्कार । रागोद्धारीं ॥ ३१ ॥

दा. ९. ८. ३१.

## १५. देवता वायुरूपानें राहातात.

देव देवता देवतें भुतें । पृथ्वीमधें असंख्यातें ।
परंतु या समस्तातें । वायोस्वरूप बोलिजे ॥ ९ ॥
वायोस्वरूप सदा असणें । प्रसंगें नाना देह धरणें ।
गुप्त प्रगट होणें जाणें । समस्तांसी ॥ १० ॥

दा. १०. ३. ९–१०

आतां रोकडी प्रचीती । मनुष्यें गुप्त प्रगटती ।
मां[3] त्या देवांच्याच मूर्ति । सामर्थ्यवंत ॥ २३ ॥

---

१ विधि. २ गुंते. ३ मग

देव देवता भुतें दैवतें । च्ढतें सामर्थ्य आहे तेथें ।
येणेंचि न्यायें राक्षसांतें । सामर्थ्यकळा ॥ २४ ॥
झोटिंग वायोस्वरूप असती । सर्वेंच खुळखुळां चालती ।
खोबरीं खारिका टाकून देती । अकस्मात ॥ २५ ॥
अवघेंचि न्याल अभावें । तरी हें बहुतेकांस ठावें ।
आपुल्याला अनुभवें । विश्वलोक जाणती ॥ २६ ॥
मनुष्यें धरिती शरीरवेष । नाना परकायाप्रवेश ।
मा[1] तो परमात्मा जगदीश । कैसा न धरी ॥ २७ ॥
म्हणोनि वायोस्वरूपें देह धरिले । ब्रह्मा विष्णु महेश जाले ।
पुढें तेचि विस्तारले । पुत्रपौत्रीं ॥ २८ ॥

दा. १०. ४. २३–२८.

१६. भुतें संतांस बाधा करूं शकत नाहींत

तैसें देव देवता दैवतें भुतें । मिथ्या म्हणों नये त्यांतें ।
आपलाल्या सामर्थ्यें ते । सृष्टीमधें फिरती ॥ २० ॥
सदा विचरती वायोस्वरूपें । स्वइच्छा पालटिती रूपें ।
अज्ञान प्राणी भ्रमे संकल्पें । त्यास बाधिती ॥ २१ ॥
ज्ञात्यास संकल्पचि असेना । म्हणोन त्यांचेन बाधवेना ।
या कारणें आत्मज्ञाना । अभ्यासावें ॥ २२ ॥

दा. १०. ९. २०–२२.

१७. देवांचें जाणीवरूपानें अस्तित्व.

जाणीव म्हणिजे अंतःकर्ण । अंतःकर्ण विष्णूचा अंश जाण ।
विष्णु करितो पाळण । येणें प्रकारें ॥ २६ ॥

---

१ मग.

नेणता प्राणी संव्हारितो । नेणीव तमोगुण बोलिजे तो ।
तमोगुणें रुद्र संव्हारितो । येणेंप्रकारें ॥ २७ ॥
कांहीं जाणीव कांहीं नेणीव । हा रजोगुणाचा स्वभाव ।
जाणतां नेणतां जीव । जन्मास येती ॥ २८ ॥
जाणिवेनें होतें सुख । नेणीवेनें होतें दुःख ।
सुखदुःख आवश्यक । उत्पत्तिगुणें ॥ २९ ॥
जाणण्यानेणण्याची बुद्धी । तोचि देहीं जाणावा विधी ।
स्थूळ देहीं ब्रह्मा त्रिशुद्धि । उत्पत्तिकर्ता ॥ ३० ॥
ऐसा उत्पत्ति स्थिति संहार । प्रसंगें बोलिला विचार ।
परंतु याचा निर्धार । प्रत्यें[1] पाहावा ॥ ३१ ॥

दा. १०. १. २६–३१.

स्वामीनें विचार दाखविला । येथें विष्णूचा अभाव दिसोन आला ।
ब्रह्मा विष्णु महेशाला । उरी[2] नाहीं ॥ १ ॥
उत्पत्ति स्थिति संव्हार । ब्रह्मा विष्णु महेश्वर ।
याचा पाहातां विचार । प्रत्ययो नाहीं ॥ २ ॥

दा. १०. २. १–२.

१८. ब्रह्मा, विष्णु, महेश यांचें केवळ प्रवृत्तिरूपानें अस्तित्व.

ब्रह्मा जन्मास घालितो । विष्णु प्रतिपाळ करितो ।
रुद्र अवघे संव्हारितो । ऐसें बोलती ॥ १० ॥
तरी हें प्रवृत्तीचें बोलणें । प्रत्ययास आणी उणें ।
प्रत्यय पाहातां श्लाघ्यवाणें । होणार नाहीं ॥ ११ ॥

१ प्रत्ययानें, प्रचीतीनें, २ ठाव, ठिकाण.

ब्रह्मयास कोणें जन्मास घातलें । विष्णूस कोणें प्रतिपाळिलें ।
रुद्रास कवणें संव्हारिलें । महाप्रळयीं ॥ १२ ॥

दा. ९. ७. १०–१२.

## १९. अनृताचें प्राबल्य.

मिथ्य तेंचि जालें सत्य । सत्य तेंचि जालें असत्य ।
मायाविभ्रमाचें कृत्य । ऐसें असे पाहातां ॥ १ ॥

सत्य कळावया कारणें । बोलिलीं नाना निरूपणें ।
तरी उठेना धरणें । असत्याचें ॥ २ ॥

असत्य अंतरीं बिंबलें । न सांगतां तें दृढ जालें ।
सत्य असोन हारपलें । जेथील तेथें ॥ ३ ॥

वेदशास्त्रें पुराणें सांगती । सत्याचा निश्चय करिती ।
तरी नये आत्मप्रचिती । सत्यस्वरूप ॥ ४ ॥

सत्य असोन आच्छादलें । मिथ्या नसोन सत्य जालें ।
ऐसें विपरीत वर्तलें । देखत देखतां ॥ ५ ॥

दा. ७. १०. १–५.

## २०. ब्रह्मांडापैलीकडील गोष्टी.

या ब्रह्मांडापैलिकडिल गोष्टी । जैं जाली नव्हती सृष्टि ।
मूळमाया सूक्ष्मदृष्टीं । वोळखावी ॥ ४७ ॥

सप्तकुंचक[1] प्रचंड । जालें नव्हतें ब्रह्मांड ।
मायें अविद्येचें बंड । ऐलिकडे ॥ ४८ ॥

ब्रह्मा विष्णु महेश्वर । हा ऐलिकडिल विचार ।
पृथ्वी मेरु सप्तसागर । ऐलिकडे ॥ ४९ ॥

---

१ सात आवरणाचें.

नाना लोक नाना स्थानें । चंद्र सूर्य तारांगणें ।
सप्त द्वीपें चौदा भुवनें । ऐलिकडे ॥ ५० ॥

शेष कूर्म सप्त पाताळ । येकविस स्वर्गें अष्टदिक्पाळ ।
तेतिस कोटी देव सकळ । ऐलिकडे ॥ ५१ ॥

बारा आदित्य अकरा रुद्र । नवनाग सप्त ऋषेश्वर ।
नाना देवांचे अवतार । ऐलिकडे ॥ ५२ ॥

मेघ मनु चक्रवती । नाना जीवांची उत्पत्ति ।
आतां असो सांगों किती । विस्तार हा ॥ ५३ ॥

सकळ विस्ताराचें मूळ । तें मूळमायाच केवळ ।
मागां निरोपिली सकळ । पंचभूतिक ॥ ५४ ॥

सूक्ष्म भूतें जे बोलिलीं । तेचि पुढें जडत्वा आलीं ।
ते सकळही बोलिलीं । पुढिले समासीं ॥ ५५ ॥

पंचभूतें पृथकाकारें । पुढें निरोपिलीं विस्तारें ।
वोळखीकारणें अत्यादरें । श्रोतीं श्रवण करावीं ॥ ५६ ॥

पंचभूतिक ब्रह्मगोळ । जेणें कळे हा प्रांजळ ।
दृश्य सांडून केवळ । वस्तुच पाविजे ॥ ५७ ॥

महाद्वार वोलांडावें । मग देवदर्शन घ्यावें ।
तैसें दृश्य हें सांडावें । जाणोनियां ॥ ५८ ॥

दा. ८. ४. ४७—५८.

## २१. सृष्टिकर्त्यास ओळखणें हीच उपासना.

ईश्वरें केवढें सूत्र केलें । सूर्यबिंब धांवाया लाविलें ।
धुकटाकरवीं धरविलें । अगाध पाणी ॥ २३ ॥

पर्वताऐसे ढग उचलती । सूर्यबिंबासी आच्छादिती ।
तेथें सर्वेचि वायोची गती । प्रगट होये ॥ २४ ॥

झिडकाझिडंकु[1] धांवे वारा । जैसा काळाचा म्हणियारा[2] ।
ढग मारुनी दिनकरा । मोकळे करी ॥ २५ ॥

बैसती विजांचे तडाखे । प्राणीमात्र अवचिता धाके[3] ।
गगन कडकडून तडके । स्थळांवरी ॥ २६ ॥

येहलोकांसी एक वर्म केलें । महद्भूतें महद्भूत आळिलें ।
सकळां समभागें चालिलें । सृष्टिरचनेसी ॥ २७ ॥

ऐसे अनंत भेद आत्मयाचे । सकळ जाणती ऐसें कैंचे ।
विवरतां विवरतां मनाचे । फडके[4] होती ॥ २८ ॥

ऐसी माझी उपासना । उपासकीं आणावी मना ।
अगाध महिमा चतुरानना । काये कळे ॥ २९ ॥

दा. १०. ८. २३–२९.

## २२. देव कोणास म्हणावें ?

बहुत देव सृष्टीवरी । त्यांची गणना कोण करी ।
येक देव कोणेपरी । ठाईं पडेना ॥ ८ ॥

बहुविध उपासना । ज्याची जेथें पुरे कामना ।
तो तेथेंचि राहिला मना । सदृढ करूनी ॥ ९ ॥

बहु देव बहु भक्त । इच्छ्या झाले आसक्त ।
बहु ऋषि बहु मत । वेगळालें ॥ १० ॥

बहु निवडतां निवडेना । एक निश्चय घडेना ।
शास्त्रें भांडती पडेना । निश्चय ठाईं ॥ ११ ॥

---

१ सोसाट्यानें. २ शिपाई. ३ भितो. ४ तुकडे.

बहुत शास्त्रीं बहुत भेद । मतांमतांस विरोध ।
ऐसा करितां वेवाद । बहुत गेले ॥ १२ ॥

सहस्त्रामधें कोणी येक । पाहे देवाचा विवेक ।
परी त्या देवाचें कौतुक । ठाई न पडे ॥ १३ ॥

ठाई न पडे कैसें म्हणतां । तेथें लागली अहंता ।
देव राहिला परता । अहंतागुणें ॥ १४ ॥

आतां असो हें बोलणें । नाना योग ज्या कारणें ।
तो देव कोण्या गुणें । ठाई पडे ॥ १५ ॥

देव कोणासी म्हणावें । कैसें तयासी जाणावें ।
तेंचि बोलणें स्वभावें । बोलिजेल ॥ १६ ॥

जेणें केलें चराचर । केले सृष्ट्यादि व्यापार ।
सर्वकर्ता निरंतर । नाम ज्याचें ॥ १७ ॥

तेणें केल्या मेघमाळा । चंद्रबिंबीं अमृतकळा ।
तेज दिधलें रविमंडळा । जया देवें ॥ १८ ॥

जयाची मर्यादा सागरा । जेणें स्थापिलें फणिवरा ।
जयाचेनि गुणें तारा । अंतरिक्ष ॥ १९ ॥

च्यारी खाणी च्यारी वाणी । चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी ।
जेणें निर्मिले लोक तिनी । तया नांव देव ॥ २० ॥

ब्रह्मा विष्णु आणि हर । हे जयाचे अवतार ।
तोचि हा देव निर्धार । निश्चयेसीं ॥ २१ ॥

देव्हारांचा उठोनि देव । करूं नेणे सर्व जीव ।
तयाचेनि ब्रह्मकटावं[1] । निर्मिला न वचे ॥ २२ ॥

---

१ ब्रह्मांडव्यूह.

ठाई ठाई देव असती। तेंहिं केली नाहीं क्षिती।
चंद्रसूर्य तारा जीमूती[1]। तयांचेनि नव्हे ॥ २३ ॥

सर्वकर्ता तोचि देव। पाहों जातां निरावेव।
ज्याची कळा लीळा लाघव। नेणती ब्रह्मादिक ॥ २४ ॥

येथें आशंका उठिली। ते पुढिलिये समासीं फिटली।
आतां वृत्ति सावध केली। पाहिज श्रोतीं ॥ २५ ॥

पैस अवकाश आकाश। कांहींच नाहीं जें भकास[2]।
तये निर्मळीं वायोस। जन्म झाला ॥ २६ ॥

वायोपासून जाला वन्ही। वन्हीपासुनी जालें पाणी।
ऐसी जयाची करणी। अघटित घडली ॥ २७ ॥

उदकापासून सृष्टि जाली। स्तंभेंविण उभारली।
ऐसी विचित्र कळा केली। त्या नांव देव ॥ २८ ॥

देवें निर्मिली हे क्षिती। तिचे पोटीं पाषाण होती।
तयासचि देव म्हणती। विवेकहीन ॥ २९ ॥

जो सृष्टिनिर्माणकर्ता। तो ये सृष्टिपूर्वी होता।
मग हे तयाची सत्ता। निर्माण झाली ॥ ३० ॥

कुलाळ[3] पात्रापूर्वी आहे। पात्रं कांहीं कुलाळ नव्हे।
तैसा देव पूर्वीच आहे। पाषाण नव्हे सर्वथा ॥ ३१ ॥

मृत्तिकेचें सैन्य केलें। कर्ते वेगळे राहिले।
कार्यकारण येक केलें। तरी होणार नाहीं ॥ ३२ ॥

तथापी होईल पंचभूतिक। निर्गुण नव्हे कांहीं येक।
कार्याकारणाचा विवेक। भुतांपरता नाहीं ॥ ३३ ॥

---

१ ढग. २ शून्य. ३ कुंभार.

अवघी सृष्टि जो कर्ता । तो ते सृष्टिहूनि पर्ता ।
तेथें संशयाची वार्ता । काहूंचि नये ॥ ३४ ॥
खांबसूत्रींची बाहुली । जेणें पुरुषें नाचविली ।
तोचि बाहुली हे बोली । घडे केवीं ॥ ३५ ॥
छायामंडपींची सेना । सृष्टिसारिखीच रचना ।
सूत्रें चाळी परी तो नाना । वेक्ति नव्हे ॥ ३६ ॥
तैसा सृष्टिकर्ता देव । परी तो नव्हे सृष्टिभाव ।
जेणें केले नाना जीव । तो जीव कैसेनी ॥ ३७ ॥
जें जें जया करणें पडे । तें तें तो हें कैसें घडे ।
म्हणोनि वायांचि बापुडे । संदेहीं पडती ॥ ३८ ॥
सृष्टि ऐसेंचि स्वभावें । गोपुर निर्मिलें बरवें ।
परी तो गोपुरकर्ता नव्हे । निश्चयेंसि ॥ ३९ ॥
तैसें जग निर्मिलें जेणें । तो वेगळा पूर्णपणें ॥
एक म्हणती मूर्खपणें । जग तोचि जगदीश ॥ ४० ॥
एवं जगदीश तो वेगळा । जग निर्माण त्याची कळा ।
तो सर्वांमध्यें परी निराळा । असोन सर्वीं ॥ ४१ ॥
म्हणोनि भूतांचा कर्दमु । यासि अलिप्त आत्मारामु ।
अविद्यागुणें मायाभ्रमु । सत्यचि वाटे ॥ ४२ ॥
मायोपाधी जगडंबर । आहे सर्वही साचार ।
ऐसा हा विपरीत विचार । कोठेंचि नाहीं ॥ ४३ ॥
म्हणोनि जग मिथ्या साच आत्मा । सर्वांपर जो परमात्मा ।
अंतर्बाह्य अंतरात्मा । व्यापूनि असे ॥ ४४ ॥
तयास म्हणावें देव । येर हें अवघेंचि वाव ।
ऐसा आहे अंतर्भाव । वेदांतींचा ॥ ४५ ॥

पदार्थ वस्तु नासिवंत । हें तों अनुभवास येत ।
याकारणें भगवंत । पदार्थावेगळा ॥ ४६ ॥
देव विमळ आणी चंचळ । शास्त्रें बोलतीं सकळ ।
तया निश्चळास सकळ । म्हणों नये सर्वथा ॥ ४७ ॥
देव आला देव गेला । देव उपजला देव मेला ।
ऐसें बोलतां दुरिताला । काये उणें ॥ ४८ ॥
जन्ममरणाची वार्ता । देवास लागेना सर्वथा ।
देव अमर ज्याची सत्ता । त्यासी मृत्य कैसेनि ॥ ४९ ॥
उपजणें आणी मरणें । येणें जाणें दुःख भोगणें ।
हें त्या देवाचें करणें । तो कारण वेगळा ॥ ५० ॥

दा. ८. १. ८–५०

२३ देह, आत्मा आणि ब्रह्म यांचा संबंध.

जड देह भूतांचा । चंचळ गुण आत्मयांचा ।
निश्चळ ब्रह्मावेगळा ठाव कैंचा । जेथें तथें ॥ १२ ॥
निश्चळ चंचळ आणि जड । पिंडीं करावा निवाड ।
प्रत्ययावेगळें जाड । बोलणें नाहीं ॥ १३ ॥
पिंडामधून आत्मा जातो । तेव्हां निवाडा कळों येतो ।
देहे जड हा पडतो । देखतदेखतां ॥ १४ ॥
जड तितुकें पडिलें । चंचळ तितुकें निघोनि गेलें ।
जड चंचळाचें रूप आलें । प्रत्ययासी ॥ १५ ॥
निश्चळ आहे सकळां ठाईं । हें तों पाहाणें नलगे कांहीं ।
गुणविकार तेथें नाहीं । निश्चळासी ॥ १६ ॥
जैसें पिंड तैसें ब्रह्मांड । विचार दिसतो उघड ।
जड चंचळ जातां जाड । परब्रह्मचि आहे ॥ १७ ॥

महाभूतांचा खंबीर[1] केला । आत्मा घालून पुतळा जाला ।
चालिला सृष्टीचा गल्बला । येणें रीती ॥ १८ ॥

आत्मा माया विकार करी। आळ घालिती ब्रह्मावरी ।
प्रत्ययें सकळ कांहीं विवरी । तोचि भला ॥ १९ ॥

ब्रह्म व्यापक अखंड । वरकड व्यापकता खंड ।
शोधून पाहातां जड । कांहींच नाहीं ॥ २० ॥

गगनासी खंडितां नये । गगनाचे नासेल काय ।
जरी जाला माहांप्रळये । सृष्टीसंव्हार ॥ २ ॥

जें सव्हारामधें सांपडलें । तें सहजाचि नासिवंत जालें ।
जाणते लोकीं उगविलें । पाहिजे कोडें ॥ २२ ॥

न कळतां वाटे कोडें । कळतां अवघें दिसे उघडें ।
म्हणोनि येकांतीं निवाडे । विचार पाहावा ॥ २१ ॥

मिळतां प्रत्ययाचे संत । येकांतापरिस येकांत ।
केली पाहिजे सावचित्त । नाना चर्चा ॥ १४ ॥

दा. २०. ७. १२–२४.

२४. चारही आत्मे मिळून एकच होत.

पाहों जातां आत्मे च्यारी । त्यांचें लक्षण अवधारी ।
हें जाणोनि अभ्यांतरीं । सदृढ धरावें ॥ ४४ ॥

येक जीवात्मा दुसरा शिवात्मा । तिसरा परमात्मा जो विश्वात्मा ।
चौथा जाणिज निर्मळात्मा । ऐसे च्यारी आत्मे ॥ ४५ ॥

भेद उंच नीच भासती । परी च्यारी येकचि असती ।
येविषीं दृष्टांत संमती । सावध ऐका ॥ ४६ ॥

---

१ सांगाडा.

घटाकाश मठाकाश । महदाकाश चिदाकाश ।
अवघे मिळोनी आकाश । येकचि असे ॥ ४७ ॥

तैसा जीवात्मा आणी शिवात्मा । परमात्मा आणी निर्मळात्मा ।
अवघा मिळोन आत्मा । येकचि असे ॥ ४८ ॥

घटीं व्यापक जें आकाश । तया नांव घटाकाश ।
पिंडीं व्यापक ब्रह्मांश । त्यास जीवात्मा बोलिजे ॥ ४९ ॥

मठीं व्यापक जें आकाश । तया नाव मठाकाश ।
तैसा ब्रह्मांडीं जो ब्रह्मांश । त्यास शिवात्मा बोलिजे ॥ ५० ॥

मठाबाहेरील आकाश । तया नांव महदाकाश ।
ब्रह्मांडाबाहेरील ब्रह्मांश । त्यास परमात्मा बोलिजे ॥ ५१ ॥

उपाधीवेगळें आकाश । तया नांव चिदाकाश ।
तैसा निर्मळात्मा परेश । तो उपाधीवेगळा ॥ ५२ ॥
उपाधीयोगें वाटे भिन्न । परी तें आकाश अभिन्न ।
तैसा आत्मा स्वानंदघन । येकचि असे ॥ ५३ ॥

दा. ८. ७. ४४–५३.

## २९. ब्रह्माचें स्वरूप.

सर्व उपाधीचा सेवट । तेथें नाहीं दृश्य खटपट ।
निर्गुण ब्रह्म घनदाट । सकळां ठांई ॥ ११ ॥
उदंड कल्पांत जाला । तरी नाश नाहीं तयाला ।
मायात्यागें शाश्वताला । वोळखावें ॥ १२ ॥
देव अंतरात्मा सगुण । सगुणें पाविजे निर्गुण ।
निर्गुणज्ञानें विज्ञान । होत असे ॥ १३ ॥
कल्पनेतीत जें निर्मळ । तेथें नाहीं मायामळ ।
मिथ्यत्वें दृश्य सकळ । होत जातें ॥ १४ ॥

जें होतें आणि सवेंचि जातें। तें तें प्रत्ययास येतें।
जेथें होणें जाणें नाहीं तें। विवेकें ओळखावें ॥ १५ ॥

एक ज्ञान एक अज्ञान। यक जाणावें विपरीत ज्ञान।
हे त्रिपुटी होये क्षीण। तेंचि विज्ञान ॥ १६ ॥

वेदांत सिद्धांत धादांत। याची पहावी प्रचित।
निर्विकार सदोदित। जेथें तेथें ॥ १७ ॥

तें ज्ञानदृष्टीनें पाहावें। पाहोन अनन्य राहावें।
मुख्य आत्मनिवेदन जाणावें। याचें नांव ॥ १८ ॥

दृश्यास दिसतें दृश्य। मनास भासतो भास।
दृश्यभासातीत अविनाश। परब्रह्म तें ॥ १९ ॥

पाहों जातां दुरीच्या दुरी। परब्रह्म सबाहे अंतरीं।
अंताचि नाहीं अनंत सरी। कोणास द्यावी ॥ २० ॥

चंचळ तें स्थिरावेना। निश्चळ तें कदापि चळेना।
आभाळ येतें जातें गगना। चळण नाहीं ॥ २१ ॥

जें विकारें वाढे मोडे। तेथें शाश्वतता कैची घडे।
कल्पांत होतांच विघडे। सकळ कांहीं ॥ २२ ॥

जें अंतरींच भ्रमलें। मायासंभ्रमें संभ्रमलें।
तयास हें कैसें उकलें। आव्हांट चक्र ॥ २३ ॥

भिडेनें वेव्हार निवडेना। भिडेनें सिद्धांत कळेना।
भिडेनें देव आकळेना। अंतर्यामीं ॥ २४ ॥

वैद्याची प्रचित येईना। आणि भीडेही उल्लंघेना।
तरी मग रोगी वांचेना। ऐसें जाणावें ॥ २५ ॥

---

१ स्वप्रत्यय. २ अफाट.

पक्षी अंतराळीं गेला । भोवतें आकाशचि तयाला ।
तैसें ब्रह्म प्राणीयांला । व्यापून आहे ॥ ९ ॥
परब्रह्म पोकळ घनदाट । ब्रह्म सेवटाचा सेवट ।
ज्यासी त्यासी ब्रह्म नीट । सर्वकाळ ॥ १० ॥
दृश्या सबाह्य अंतरीं । ब्रह्म दाटलें ब्रह्मांडोदरीं ।
आरे त्या विमळाची सरी । कोणास द्यावी ॥ ११ ॥
वैकुंठकैळासस्वर्गलोकीं । इंद्रलोकीं चौदा लोकीं ।
पन्नगादिक पाताळलोकीं । तेथेंहि आहे ॥ १२ ॥
कासीपासून रामेश्वर । आवघें दाटलें अपार ।
परता परता पारावार । त्यास नाहीं ॥ १३ ॥
परब्रह्म तें येकलें । येकदांचि सकळांसी व्यापिलें ।
सकळांस स्पर्शोन राहिलें । सकळां ठाई ॥ १४ ॥
परब्रह्म पाउसें भिजेना । अथवा चिखलानें भरेना ।
पुरामधें परी वाहेना । पुरासमागमें ॥ १५ ॥
येकसरें सन्मुख विमुख । वाम सव्य दोहिंकडे येक ।
आर्धऊर्ध प्राणी सकळीक । व्यापून आहे ॥ १६ ॥
आकाशाचा डोहो भरला । कदापी नाहीं उचंबळला ।
असंभाव्य पसरला । जिकडे तिकडे ॥ १७ ॥
येकजिनसी गगन उदास । जेथें नाहीं दृश्यभास ।
भासेंविण निराभास । परब्रह्म जाणावें ॥ १८ ॥
संतसाधुमाहानुभावां । देवदानवमानवां ।
ब्रह्म सकळांसी विसांवा । विश्रांतिठाव ॥ १९ ॥
कोणेकडे सेवटा जावें । कोणीकडे काये पाहावें ।
असंभाव्य तें नेमावें । काये म्हणोनि ॥ २० ॥

स्थूळ नव्हे सूक्ष्म नव्हे । कांहीं येकासारिखें नव्हे ।
ज्ञानदृष्टीविण नव्हे । समाधान ॥ २१ ॥

पिंडब्रह्मांडनिरास । मग तें ब्रह्म निराभास ।
येथूनि तेथवरी अवकास । भकांसरूप[1] ॥ २२ ॥

ब्रह्म व्यापक हें तों खरें । दृश्य आहे तों हें उत्तरें ।
व्यापेंविण कोण्या प्रकारें । व्यापक म्हणावें ॥ २३ ॥

दा. १०. १०. १–२३.

## ४. कर्मयोग



### ७३. निःस्पृहवर्तणूक.

मूर्ख येकदेसी होतो । चतुर सर्वत्र पाहातो ।
जैसा बहुधा होऊन भोगितो । नाना सुखें ॥ १ ॥

तोचि अंतरात्मा महंत । तो कां होईल संकोचित ।
प्रशस्त जाणता समस्त । विख्यात योगी ॥ २ ॥

कर्ता भोक्ता तत्वता । भूमंडळीं सर्व सत्ता ।
त्यावेगळा त्यास ज्ञाता । पाहेसा कवणु ॥ ३ ॥

ऐसें महंतें असावें । सर्व सार शोधून घ्यावें ।
पाहों जातां न संपडावें । येकायेकीं ॥ ४ ॥

कीर्तिरूपें उदंड ख्यात । जाणती लहान थोर समस्त ।
वेष पहातां शाश्वत । येकहि नाहीं ॥ ५ ॥

प्रगट कीर्ति ते ढळेना । बहुत जनास कळेना ।
पाहों जातां आढळेना । काये कैसें ॥ ६ ॥

---

१ शून्य.

वेषभूषण तें दूषण । कीर्तिभूषण तें भूषण ।
चाळणेविण[1] येक क्षण । जाऊंच नेदी ॥ ७ ॥

त्यागी वोळखीचे जन । सर्वकाळ नित्य नूतन ।
लोक शोधून पाहातां मन । परी इच्छा दिसेना ॥ ८ ॥

पुर्तें कोणाकडे पाहेना । पुर्तें कोणासीं बोलेना ।
पुर्तें येके स्थळीं राहेना । उठोन जातो ॥ ९ ॥

जातें स्थळ तें सांगेना । सांगितलें तेथें तरी जायेना ।
आपुली स्थिती अनुमाना । येवोंच नेदी ॥ १० ॥

लोकीं केलें तें चुकावी । लोकीं भाविलें तें उलथवी ।
लोकीं तर्किलें तें दावी । निर्फळ करूनि ॥ ११ ॥

लोकांस पाह्याचा आदर । तेथें याचा अनादर ।
लोक सर्वकाळ तत्पर । तेथें याची अनिच्छया ॥ १२ ॥

एवं कल्पितां कल्पेना । ना तर्कितांहि तर्केना ।
कदापी भावितां भावेना । योगेश्वर ॥ १३ ॥

ऐस अंतर सांपडेना । शरीर ठाईं पडेना ।
क्षण येक विशंभेना[2] । कथाकीर्तन ॥ १४ ॥

लोक संकल्प विकल्प करिती । ते अवघेचि निर्फळ होती ।
जनाची जना लाजवी वृत्ति । तेव्हां योगेश्वर ॥ १५ ॥

बहुतीं शोधून पाहिलें । बहुतांच्या मनास आलें ।
तरी मग जाणावें साधिलें । महत्कृत्य ॥ १६ ॥

अखंड येकांत सेवावा । अभ्यासचि करीत जावा ।
काळ सार्थकचि करावा । जनासहित ॥ १७ ॥

---

१ विचार. २ सोडीना.

उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनास सिकवावे ।
उदंड समुदाये करावे । परी गुप्तरूपें ॥ १८ ॥

अखंड कामाची लगबग । उपासनेस लावावें जग ।
लोक समजोन मग । आज्ञा इच्छिती ॥ १९ ॥

आधीं कष्ट मग फळ । कष्टाचि नाहीं तें निर्फळ ।
साक्षेपेंविण केवळ । वृथापुष्ट ॥ २० ॥

लोक बहुत शोधावे । त्यांचे अधिकार जाणावे ।
जाणजाणोन धरावे । जवळी दुरी ॥ २१ ॥

अधिकारपरत्वें कार्य होतें । अधिकार नस्तां वेर्थ जातें ।
जाणोनि शोधावीं चित्तें । नाना प्रकारें ॥ २२ ॥

अधिकार पाहोन कार्य सांगणें । साक्षेप पाहोन विश्वास धरणें ।
आपला मगज राखणें । कांहीं तरीं ॥ २३ ॥

हें प्रचितीचें बोलिलें । आधीं केलें मग सांगितलें ।
मानेल तरी पाहिजे घेतलें । कोणी येकें ॥ २४ ॥

महंतें महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे ।
जाणते करून विखरावे । नाना देसीं ॥ २५ ॥

दा. ११. १०.

### ७४. उत्तमपुरुषनिरूपण.

नेमकपणें वर्तों लागला । तो बहुतांस कळों आला ।
सर्व आर्जवी तयाला । काये उणें ॥ १४ ॥

ऐसा उत्तम गुणी विशेष । तयास म्हणावें पुरुष ।
जयाचिया भजनें जगदीश । तृप्त होये ॥ १५ ॥

उदंड धिःकारून बोलती। तरी चळों नेदावी शांती।
दुर्जनास मिळोन जातां। धन्य ते साधु ॥ १६ ॥

उत्तम गुणीं शृंघारला। ज्ञानवैराग्यें शोभला।
तोचि येक जाणावा भला। भूमंडळीं ॥ १७ ॥

स्वयें आपण कष्टावें। बहुतांचें सोशित जावें।
झिजोन कीर्तीस उरवावें। नाना प्रकारें ॥ १८ ॥

कीर्ती पाहों जातां सुख नाहीं। सुख पहातां कीर्ती नाहीं।
विचारेंविण कोठेंचि नाहीं। समाधान ॥ १९ ॥

परांतरास न लावावा ढका[1]। कदापि पडों नेदावा चुका।
क्षमा[2]सीळ तयाच्या तुका। हानी नाहीं ॥ २० ॥

आपलें अथवा परावें। कार्य अवघेंचि करावें।
प्रसंगीं कामास चुकवावें। हें विहित नव्हे ॥ २१ ॥

बरें बोलतां सुख वाटतें। हें तों प्रत्यक्ष कळतें।
आत्मवत् परावें तें। मानीत जावें ॥ २२ ॥

कठिण शब्दें वाईट वाटतें। हें तों प्रत्ययास येतें।
तरी मग वाईट बोलावें तें। काये निमित्य ॥ २३ ॥

आपणास चिमोटा[3] घेतला। तेणें कासावीस जाला।
आणावरून दुसऱ्याला। राखत जावें ॥ २४ ॥

जे दुसऱ्यास दुःख करी। ते अपवित्र वैखरी।
आपणास घात करी। कोणियेके प्रसंगीं ॥ २५ ॥

पेरिलें तें उगवतें। बोलण्यासारिखें उत्तर येतें।
तरी मग कर्केश बोलावें तें। काये निमित्य ॥ २६ ॥

---

१ धका. २ क्षमा. ३ चिमटा.

आपुल्या पुरुषार्थवैभवें। बहुतांस सुखी करावें।
परंतु कष्टी करावें। हे राक्षसी क्रिया ॥ २७॥

दंभ दर्प अभिमान। क्रोध आणि कठिण वचन।
हें अज्ञानाचें लक्षण। भगवद्गीतेंत बोलिलें॥ २८॥

जो उत्तम गुणें शोभला। तोचि पुरुष माहा भला।
कित्तेक लोक तयाला। शोधीत फिरती ॥ २९ ॥

क्रियेवीण शब्दज्ञान। तेंचि श्वानाचें वमन।
भलें तेथें अवलोकन। कदापि न करिती॥ ३० ॥

मनापासून भक्ति करणें। उत्तम गुण अगत्य धरणें।
तया माहांपुरुषाकारणें। धुंडीत येती ॥ ३१ ॥

ऐसा जो माहानुभाव। तेणें करावा समुदाव।
भक्तियोगें देवाधिदेव। आपुला करावा॥ ३२॥

आपण आवांचितें[1] मरोन जावें। मग भजन कोणें करावें।
याकारणें भजनास लावावे। बहुत लोक॥ ३३ ॥

आमची प्रतिज्ञा ऐसी। कांहीं न मागावें शिष्यासी।
आपणामागें जगदीशासी। भजत जावें॥ ३४॥

याकारणें समुदाव। जाला पाहिजे मोहोछाव।
हातोपातीं देवाधिदेव। वोळेसा करावा॥ ३५॥

आतां समुदायाकारणें। पाहिजेती दोनी लक्षणें।
श्रोतीं येथें सावधपणें। मन घालावें॥ ३६॥

जेणें बहुतांस घडे भक्ति। ते हे रोकडी प्रबोध[2]शक्ति।
बहुतांचें मनोगत हातीं। घेतलें पाहिजे॥ ३७॥

---

१ अवाचित, एकदम　२ उद्बोधन.

मागां बोलिले उत्तम गुण । तयास मानिती प्रमाण।
प्रबोधशक्तीचें लक्षण । पुढें चाले ॥ ३८ ॥

बोलण्यासारिखें चालणें । स्वयें करून बोलणें ।
तयाचीं वचनें प्रमाणें । मानिती जनीं ॥ ३९ ॥

जें जें मनास मानेना । तें तें जनही मानीना ।
आपण येकला जन नाना । सृष्टिमधें ॥ ४० ॥

म्हणोन सांगाती[1] असावें । मानत मानत शिकवावे ।
हळु हळु सेवटा न्यावे । विवेकानें ॥ ४१ ॥

दा. १२. १० १४–४१.

## ७५. महंतलक्षणें.

जयास येत्नचि आवडे । नाना प्रसंगीं पवाडे ।
धीटपणें प्रगट, दडे । ऐसा नव्हे ॥ १२ ॥

सांकडीमधें वर्तों जाणे । उपाधीमधें मिळों जाणे ।
अलिप्तपणें राखों जाणे । आपणांसी ॥ १३ ॥

आहे तरी सर्वां ठाईं । पाहों जातां कोठेंचि नाहीं ।
जैसा अंतरात्मा ठाईंचा ठाईं । गुप्त जाला ॥ १४ ॥

त्यावेगळें कांहींच नसे । पाहों जातां तो न दिसे ।
न दिसोन वर्तवीत असे । प्राणीमात्रांसी ॥ १५ ॥

तैसाच हाही नानापरी । बहुत जनांस शाहाणे करी ।
नाना विद्या त्या विवरी । स्थूळ सूक्ष्मा ॥ १६ ॥

आपणाकरितां शाहाणे होती । ते सहजाचि सोये धरिती[2] ।
जाणतेपणाची महंती । ऐसी असे ॥ १७ ॥

---

१ सोबती. २ शिरतो.

राखों जाणे नीतिन्याये । न करी न करवी अन्याये ।
कठीण प्रसंगीं उपाये । करूं जाणे ॥ १८ ॥
ऐसा पुरुष धारणे[1]चा । तोचि आधार बहुतांचा ।
दास म्हणे रघुनाथाचा । गुण घ्यावा ॥ १९ ॥

दा. ११. ६. १२–१९.

७६. " जंव उत्तम गुण न कळे । तों या जनास काये कळे. "

बोलतो खरें चालतों खरें । त्यास मानिती लहानथोरें ।
न्याये अन्याये परस्परें । सहजाचि कळे ॥ १५ ॥
लोकांस कळेना तंवरी । विवेकें क्षमा[2] जो न करी ।
तेणेंकरितां बराबरी । होत जाते ॥ १६ ॥
जंवरी चंदन झिजेना । तंव तो सुगंध कळेना ।
चंदन आणि वृक्ष नाना । सगट होती ॥ १७ ॥
जंव उत्तम गुण न कळे । तों या जनास काये कळे ।
उत्तम गुण देखतां निवळे । जगदांतर ॥ १८ ॥
जगदांतर निवळत गेलें । जगदांतरीं सख्य जालें ।
मग जाणावें वोळले[3] । विश्वजन ॥ १९ ॥
जनीं जनार्दन वोळला । तरी काये उणें तयाला ।
राजी राखावें सकळांला । कठिण आहे ॥ २० ॥
पेरिलें तें उगवतें । उसिणें द्यावें घ्यावें लागतें ।
वर्म काढितां भंगतें । परांतर ॥ २१ ॥
लोकिकीं बरेंपण केलें । तेणें सौख्य वाढलें ।
उत्तरासारिखें आलें । प्रत्योत्तर ॥ २२ ॥

---

१ धैर्य. २ क्षमा. ३ वश झाले.

हें आवघें आपणांपासीं । येथें बोल नाहीं जनासी ।
सिकवावें आपल्या मजासी । क्षणक्षणा ॥ २३ ॥

खळ दुर्जन भेटला । क्षमेचा धीर बुडाला ।
तरी मौनेंचि स्थळत्याग केला । पाहिजे साधकें ॥ २४ ॥

लोक नाना परीक्षा जाणती । अंतरपरीक्षा नेणती ।
तेणें प्राणी करंटे होती । संदेह नाहीं ॥ २५ ॥

आपणास आहे मरण । म्हणौन राखावें बरेंपण ।
कठिण आहे लक्षण । विवेकाचें ॥ २६ ॥

दा. १२. २. १९–२६.

## ७७. शिकवणनिरूपण.

तैसें निंद्य सोडूनि द्यावें । वंद्य तें हृदईं धरावें ।
सत्कीर्तीनें भरावें । भूमंडळ ॥ २० ॥

उत्तमासि उत्तम माने । कनिष्ठांस तें न माने ।
म्हणौन करंटे देवानें । करून ठेविले ॥ २१ ॥

सांडा अवघें करंटपण । धरावें उत्तम लक्षण ।
हरिकथा पुराण श्रवण । नीति न्याये ॥ २२ ॥

वर्तायाचा विवेक । राजी राखणें सकळ लोक ।
हळु हळु पुण्यश्लोक । करीत जावे ॥ २३ ॥

मुलाचे चालीनें चालावें । मुलाच्या मनोगतें बोलावें ।
तैसें जनांस शिकवावें । हळुहळु ॥ २४ ॥

मुख्य मनोगत राखणें । हेचि चातुर्याचीं लक्षणें ।
चतुर तो चतुरांग जाणे । इतर तीं वेडीं ॥ २५ ॥

---

१ चारिकडचें ज्ञान, चारी अंगें

वेडयास वेडें म्हणों नये । वर्म कदापि बोलों नये ।
तरीच घडे दिग्विजये । निस्पृहासी ॥ २६ ॥
उदंड स्थळीं उदंड प्रसंग । जाणोनि करणें येथासांग ।
प्राणिमात्रांचा अंतरंग । होऊन जावें ॥ २७ ॥
मनोगत राखों न जातां । परस्परें होये अवस्ता ।
मनोगत तोडितां वेवस्ता[१] । बरी नाहीं ॥ २८ ॥
याकारणें मनोगत । राखेल तो मोठा महंत ।
मनोगत राखतां समस्त । वोढोन येती ॥ २९ ॥

दा. १३. १०. २०–२९.

## ७८. विवेकनिरूपण.

उपासना करूनियां पुढें । पुरवलें पाहिजे चहूंकडे ।
भूमंडळीं जिकडे तिकडे । जाणती तया ॥ ८ ॥
जाणती परी आडळेना । काय करितो तें कळेना ।
नाना देसीचे लोक नाना । येऊन जाती ॥ ९ ॥
तितुक्यांचीं अंतरें धरावीं । विवेकें विचारें भरावीं ।
कडोविकंडीचीं[२] विवरावीं । अंतःकर्णें ॥ १० ॥
किती लोक तें कळेना । किती समुदाव आकळेना ।
सकळ लोक श्रवणमनना । मधें घाली ॥ ११ ॥
फड[३] समजाविस[४] करणें । गद्यपद्य सांगणें ।
परांतरासी राखणें । सर्वकाळ ॥ १२ ॥
ऐसा ज्याचा दंडक । अखंड पाहाणें विवेक ।
सावधापुढें अविवेक । येईल कैंचा ॥ १३ ॥

---

१ व्यवस्था, स्थिति. २ धरसोडीची. ३ समुदाय. ४ समजूत.

जितुकें कांहीं आपणासि ठावें । तितुकें हळुहळु सिकवावें ।
शाहाणे करून सोडावे । बहुत जन ॥ १४ ॥

परोपरीं सिकवणें । आडणुका सांगत जाणें ।
निवळ करून सोडणें । निस्पृहांसी ॥ १५ ॥

होईल तें आपण करावें । न होतां जनाकरवीं करवावें ।
भगवद्भजन राहावें । हा धर्म नव्हे ॥ १६ ॥

आपण करावें करवावें । आपण विवरावें विवरवावें ।
आपण धरावें धरवावें । भजनमार्गासी ॥ १७ ॥

जुन्या लोकांचा कंटाळा आला । तरी नूतन प्रांत पाहिजे धरिला ।
जितुकें होईल तितुक्याला । आळस करूं नये ॥ १८ ॥

देह्याचा अभ्यास बुडाला । म्हणिजे महंत बुडाला ।
लागवेगें नूतन लोकांला । शाहाणे करावें ॥ १९ ॥

उपाधींत सांपडों नये । उपाधीस कंटाळों नये ।
निसुगपण[1] कामा नये । कोणीयेकविषीं ॥ २० ॥

काम नासणार नासतें । आपण वेडें उगेंच पाहातें ।
आळसी ह्रदयसुन्य तें । काये करूं जाणें ॥ २१ ॥

धकाधकीचा मामला[2] । कैसा घडे अशक्ताला ।
नाना बुद्धी शक्ताला । म्हणोनि सिकवाव्या ॥ २२ ॥

व्याप होईल तों राहावें । व्याप राहातां उठोन जावें ।
आनंदरूप फिरावें । कोठें तरी ॥ २३ ॥

उपाधीपासूनि सुटला । तो निस्पृहपणें बळावला ।
जिकडे अनुकूल तिकडे चालिला । सावकास ॥ २४ ॥

---

१ कंटाळा २ उद्योग.

कीर्ति पाहातां सुख नाहीं । सुख पाहातां कीर्ति नाहीं ।
केल्याविण कांहींच नाहीं । कोठें तरी ॥ २५ ॥
येरवीं काय राहातें । होणार तितुकें होऊन जातें ।
प्राणी मात्र अशक्त तें । पुढें आहे ॥ २६ ॥
आधींच तकवा सोडिला । मधेंचि धीवसा[1] सांडिला ।
तरी संसार हा सेवटाला । कैसा पावे ॥ २७ ॥
संसार मुळींच नासका । विवेकें करावा नेटका ।
नेटका करितां फिका । होत जातो ॥ २८ ॥
ऐसा याचा जिनसाना[2] । पाहातां कळों येतें मना ।
परंतु धीर सांडावा ना । कोणीयेकें ॥ २९॥

दा. १९. १०. ८–२९.

### ७९. राजकारणनिरूपण.

ज्ञानी आणी उदास । समुदायाचा हव्यास ।
तेणें अखंड सावकास । येकांत सेवावा ॥ १ ॥
जेथें तजवीजा कळती । अखंड चाळणा निघती ।
प्राणीमात्रांची स्थिती गती । कळों येते ॥ २ ॥
जरी हा चाळणाचि करीना । तरी कांहींच उमजेना ।
हिसेबझाडाचि पाहीना । दिवाळखोर ॥ ३ ॥
येक मिरासी साधिती । येक सीध्या गवांविती[3] ।
व्यापकपणाची स्थिती । ऐसी आहे ॥ ४ ॥
जेणें जें जें मनीं धरिलें । तें तें आधींच समजलें ।
कृत्रिम अवघेंचि खुंटलें । सहजाचि येणें ॥ ५ ॥

१ धीर. २ स्वभाव ३ गमाविती.

अखंड राहतां सलगी होते । अतिपरिचयें अवज्ञा घडते ।
याकारणें विश्रांतीतें । घेतां नये ॥ ६ ॥

आळसें आळस केला । तरी मग कारबारचि[1] बुडाला ।
अंतरहेत चुकत गेला । समुदायाचा ॥ ७ ॥

उदंड उपासनेचीं कामें । लावीत जावीं नित्यनेमें ।
अवकाश कैंचा कृत्रिमें । करावयासी ॥ ८ ॥

या अवघ्या पहिल्याच गोष्टी । प्राणी कोणी नव्हतां कष्टी ।
राजकारणें मंडळ वेष्टी । चहुंकडे ॥ १० ॥

नष्टासी नष्ट योजावे । वाचाळासी वाचाळ आणावे ।
आपणावरी विकल्पाचे गोवे । पडोंच नेदी ॥ ११ ॥

कांटीनें कांटी झाडावी । झाडावी परी ते कळों नेदावी ।
कळकटेपणाची[2] पदवी । असों द्यावी ॥ १२ ॥

न कळतां करी कार्य जें तें । तें काम तत्काळचि होतें ।
गचगचेंत[3] पडतां तें । चमत्कारें नव्हे ॥ १३ ॥

ऐकोनी आवडी लागावी । देखोनी बळकटचि व्हावी ।
सलगीनें आपली पदवी । सेवकामध्यें ॥ १४ ॥

कोणी येक काम करितां होतें । न करितां तें मागें पडतें ।
याकारणें ढिलेपण तें । असोंचि नये ॥ १५ ॥

जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ।
जो आपणचि कष्टत गेला । तोचि भला ॥ १६ ॥

अवघ्यांस अवघें कळलें । तेव्हां तें रितें पडिलें ।
याकारणें ऐसें घडलें । न पाहिजे कीं ॥ १७ ॥

---

१ व्याप. १ बावळटपणा. ३ अतिविचार.

मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकांकरवीं करवावें ।
कित्तेक खलक उगवावे । राजकारणामधें ॥ १८ ॥

ग्रामण्य वर्मी सांपडावें । रगडून पीठचि करावें ।
करूनि मागुतीं सांवरावें । बुडऊं नये ॥ २० ॥

खळदुर्जनासी भ्यालें । राजकारण नाहीं राखिलें ।
तेणें अवघें प्रगट जालें । बरें वाईट ॥ २१ ॥

समुदाव पाहिजे मोठा । तरी तनावा असाव्या बळकटा ।
मठ करूनि ताठा । धरूं नये ॥ २२ ॥

दुर्जन प्राणी समजावे । परी ते प्रगट न करावे ।
सज्जनापरीस आळवावे । महत्त्व देउनी ॥ २३ ॥

जनामधें दुर्जन प्रगट । तरी मग अखंड खटपट ।
याकारणें ते वाट । बुझूनि टाकावी ॥ २४ ॥

गनीमाच्या देखतां फौजा । रणशूरांच्या फुर्फुरिती भुजा ।
ऐसा पाहिजे कीं राजा । कैपक्षी परमार्थी ॥ २५ ॥

तयास देखतां दुर्जन धाके । बैसवी प्रचीतीचे तडाखे ।
बंड पाषांडाचे वाखे । सहजचि होती ॥ २६ ॥

हे धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें ।
ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊं नये ॥ २७ ॥

कोठेंच पडेना दृष्टीं । ठाईं ठाईं त्याच्या गोष्टी ।
वाग्विळासें सकळ सृष्टी । वेधिली तेणें ॥ २८ ॥

हुंब्यास हुंबा लाऊन द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा ।
लौंदास पुढें उभा करावा । दुसरा लौंद ॥ २९ ॥

---

१ काटे. २ ताणणाच्या दोऱ्या. ३ कैवारी. ४ धटिंगण.

घटसी आणावा घट । उद्धटासी पाहिजे उद्धट ।
खटनटांसी[1] खटनट । अगत्य करी ॥ ३० ॥
जैशास तैसा जेव्हां भेटे । तेव्हां मज्यालसी[2] थाटे ।
इतुकें होतें परी धनी कोठें । दृष्टीस न पडे ॥ ३१ ॥

दा. १९. ९.

८०. " कांहीं गलबला कांहीं निवळ । ऐसा कंठित जावा काळ. "

ज्यासी उपाधी आवरेना । तेणें उपाधी वाढवावी ना ।
सावचित्त करूनिया मना । समाधानें असावें ॥ १९ ॥
धांवधांवों उपाधी वेष्टी । आपण कष्टी लोकहि कष्टी ।
हे कामा नये गोष्टी । कुसमुसेची[3] ॥ २०
लोक बहुत कष्टी जाला । आपणही अत्यंत त्रासला ।
वेर्थचि केला गलबला । कासयासी ॥ २१ ॥
असो उपाधीचें काम ऐसें । कांहीं बरें कांहीं कांणासें[4] ।
सकळ समजोन ऐसें । वर्ततां बरें ॥ २२ ॥
लोकांपासीं भावार्थ कैंचा । आपण जगवावा तयांचा ।
शेवट उपंढरें[5] कोणाचा । पडोंचि नये ॥ २३ ॥
अंतरात्म्याकडे सकळ लागे । निर्गुणीं हें कांहींच नलगे ।
नाना प्रकारीचे दगे । चंचळामधें ॥ २४ ॥
शुद्ध विश्रांतीचें स्थळ । तें येक निर्मळ निश्चळ ।
तेथें विकारचि सकळ । निर्विकार होती ॥ २५ ॥
उद्वेग अवघे तुटोन जाती । मनास वाटे विश्रांति ।
ऐसी दुल्लभ परब्रह्मस्थिति । विवेकें सांभाळावी ॥ २६ ॥

---

१ वावदूक २ मजलस, सभा. ३ कुरकुर. ४ वांकडे. ५ दमस्फोट.

आपणास उपाधी मुळींच नाहीं । रुणानुबंधें मिळालीं सर्वही ।
आल्यागेल्याची क्षिती नाहीं । ऐसें जालें पाहिजे ॥ २७ ॥

जो उपाधीस कंटाळला । तो निवांत होऊन बैसला ।
आटोपेना तो गल्बला । कासयासी ॥ २८ ॥

कांहीं गल्बला कांहीं निवळ । ऐसा कंठित जावा काळ ।
जेणेंकरितां विश्रांति वेळ । आपणासि फावे ॥ २९ ॥

उपाधी कांहीं रहात नाहीं । समाधानायेवढें थोर नाहीं ।
नरदेह प्राप्त होत नाहीं । क्षणक्षणा ॥ ३० ॥

दा. १९. ८. १९-३०.

## ८१. समर्थलक्षण.

तो सकळ जनासी व्हावा । जेथें तेथें नित्य नवा ।
मूर्खपणें अनुमान गोवा । कांहींच नाहीं ॥ ५ ॥

नाना उत्तम गुण सत्पात्र । तेचि मनुष्य जगमित्र ।
प्रगट कीर्ती स्वतंत्र । पराधेन नाहीं ॥ ६ ॥

राखे सकळांचें अंतर । उदंड करी पाठांतर ।
नेमस्तपणाचा विसर । पडणार नाहीं ॥ ७ ॥

नम्रपणें पुसों जाणे । नेमस्त अर्थ सांगों जाणे ।
बोलाऐसें वर्तों जाणे । उत्तम क्रिया ॥ ८ ॥

जो मानला बहुतांसी । कोणी बोलों न शके त्यासी ।
धगधगीत पुण्यरासी । माहांपुरुष ॥ ९ ॥

तो परोपकार करितचि गेला । पाहिजे तो ज्याला त्याला ।
मग काये उणें तयाला । भूमंडळीं ॥ १० ॥

बहुत जन वास[1] पाहे । वेळेसी तत्काळ उभा राहे ।
उणें कोणाचें न साहे । तया पुरुषासी ॥ ११ ॥

चौदा विद्या चोसष्टी कळा । जाणे संगीत गायेनकळा ।
आत्मविद्येचा जिव्हाळा । उदंड तेथें ॥ १२ ॥

सकळांसी नम्र बोलणें । मनोगत राखोन चालणें ।
अखंड कोणायेकाचें उणें । पडोंचि नेदी ॥ १३ ॥

न्याय नीति भजन मर्यादा । काळ सार्थक करी सदा ।
दरिद्रपणाची आपदा । तेथें कैची ॥ १४ ॥

उत्तमगुणें शृंघारला । तो बहुतांमधें शोभला ।
प्रगट प्रतापें उगवला । मार्तंड जैसा ॥ १५ ॥

जाणता पुरुष असेल जेथें । कळहो कैचा उठेल तेथें ।
उत्तम गुणाविषयीं रितें । तें प्राणी करंटें ॥ १६ ॥

प्रपंचीं जाणे राजकारण । परमार्थी साकल्यविवरण ।
सर्वांमधें उत्तम गुण । त्याचा भोक्ता ॥ १७ ॥

मागें येक पुढें येक । ऐसा कदापी नाहीं दंडक[2] ।
सर्वत्रांसी अलोलिक । तया पुरुषाची ॥ १८ ॥

अंतरासी लागेल ढका । ऐसी वर्तणूक करूं नका ।
जेथें तेथें विवेका । प्रगट करी ॥ १९ ॥

कर्मविधी उपासनाविधी । ज्ञानविधी वैराग्यविधी ।
विशाळ ज्ञातृत्वाची बुद्धी । चळेल कैसी ॥ २० ॥

पाहातां अवघे उत्तम गुण । तयास वाईट म्हणेल कोण ।
जैसा आत्मा संपूर्ण । सर्वां घटीं ॥ २१ ॥

---

१ वाट. २ रिवाज, रीत ३ आवड.

आपल्या कार्यास तत्पर । लोक असती लहान थोर ।
तैसाचि करी परोपकार । मनापासुनी ॥ २२ ॥
दुसऱ्याच्या दुःखें दुखवे । दुसऱ्याच्या सुखें सुखावे ।
अवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ॥ २३ ॥
उदंड मुलें नानापरी । वडिलांचें मन अवघ्यांवरी ।
तैसी अवघ्यांची चिंता करी । माहांपुरुष ॥ २४ ॥
जयास कोणाचें सोसेना । तयाची निःकांचन वासना ।
धीकारिल्या धीकारेना । तोचि माहांपुरुष ॥ २५ ॥
मिथ्या शरीर निंदिलें । तरी यानें काये गेलें ।
ज्ञात्यासि आणि जिंकिलें । देहबुद्धीनें ॥ २६ ॥
हें अवघें अवलक्षण । ज्ञाता देहीं विलक्षण ।
कांहीं तरी उत्तम गुण । जनीं दाखवावे ॥ २७ ॥
उत्तम गुणास मनुष्य वेधे । वाईट गुणास प्राणी खेदे ।
तीक्षण बुद्धि लोक साधे । काये जाणती ॥ २८ ॥
लोकीं अत्यंत क्षमा करिती । आलियां लोकांची प्रचिती ।
मग ते लोक पाठी राखती । नाना प्रकारीं ॥ २९ ॥
बहुतांसी वाटे मी थोर । सर्वमान्य पाहिजे विचार ।
धीर उदार गंभीर । माहांपुरुष ॥ ३० ॥
जितुके कांहीं उत्तम गुण । तें समर्थाचें लक्षण ।
अवगुण तें करंटलक्षण । सहजचि जालें ॥ ३१ ॥

दा. १९. ४. ९–३१.

८२. " भगवत्कीर्तीनें भरावें । भूमंडळ. "

कोण्हास कांहींच न मागावें । भगवद्भजन वाढवावें ।
विवेकबळें जन लावावे । भजनाकडे ॥ ११ ॥

परांतर रक्षायाचीं कामें । बहुत कठीण विवेकवर्में ।
स्वइच्छेनें स्वधर्में । लोकरा¹हाटी ॥ १२ ॥

आपण तुरुक गुरु केला । शिष्य चांभार मेळविला ।
नीच यातीनें नासला । समुदाव ॥ १३ ॥

ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या । भक्तमंडळ्या मानाव्या ।
संतमंडळ्या शोधाव्या । भूमंडळीं ॥ १४ ॥

उत्कट भव्य तेंचि घ्यावें । मळमळित अवघेंचि टाकावें ।
निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ॥ १५ ॥

अक्षर बरें वाचणें बरें । अर्थांतर सांगणें बरें ।
गाणें नाचणें अवघेंचि बरें । पाठांतर ॥ १६ ॥

दीक्षा बरी मीत्री² बरी । तीक्षण बुद्धि राजकारणीं बरी ।
आपणास राखे नानापरी । अलिप्तपणें ॥ १७ ॥

अखंड हरिकथेचा छंदु । सकळांस लागे नामवेदु³ ।
प्रगट जयाचा प्रबोधु । सूर्य जैसा ॥ १८ ॥

दुर्जनासी राखों जाणे । सज्जनासी निवऊं जाणे ।
सकळांचें मनींचें जाणे । ज्याचे त्यापरी ॥ १९ ॥

संगतीचें मनुष्य पालटे । उत्तम गुण तत्काळ उठे ।
अखंड अभ्यासीं लगटे । समुदाव ॥ २० ॥

जेथें तेथें नित्य नवा । जनासी वाटे हा असावा ।
परंतु लालचीचा गोवा । पडोंचि नेदी ॥ २१ ॥

उत्कट भक्ति उत्कट ज्ञान । उत्कट चयातुर्य उत्कट भजन ।
उत्कट योग अनुष्ठान । ठाईं ठाईं ॥ २२ ॥

उत्कट निस्पृहता धरिली । त्याची कीर्ति दिगांतीं फांकली ।
उत्कट भक्तीनें निवाली । जनमंडळी ॥ २३ ॥

---

१ वहिवाट. २ मैत्री. ३ वेध.

कांहीं येक उत्कटेंविण । कीर्ति कदापि नव्हे जाण ।
उगेंच वणवण हिंडोन । काय होतें ॥ २४ ॥
नाहीं देह्याचा भरवसा । केव्हां सरेल वयसा[1] ।
प्रसंग पडेल कैसा । कोण जाणे ॥ २५ ॥
याकारणें सावधान असावें । जितुकें होईल तितुकें करावें ।
भगवत्कीर्तीनें भरावें । भूमंडळ ॥ २६ ॥
आपणास जें जें अनुकूळ । तें तें करावें तत्काळ ।
होईना त्यास निवळ । विवेक उमजावा ॥ २७ ॥
विवेकामधें सांपडेना । ऐसें तों कांहींच असेना ।
येकांतीं विवेक अनुमाना । आणून सोडी ॥ २८ ॥
अखंड तजवीजा चाळणा जेथें । पाहतां काये उणें तेथें ।
येकांतेंविण प्राणीयांतें । बुद्धि कैंची ॥ २९ ॥
येकांतीं विवेक करावा । आत्माराम वोळखावा ।
येथून तेथवरी गोवा । कांहींच नाहीं ॥ ३० ॥

दा. १९. ६. ११–३०.

## ८३. रामदासांचें आत्मचरित्र.

पृथ्वीमधें मानवी शरीरें । उदंड दाटलीं लहानथोरें ।
पालटती मनोविकारें । क्षणक्षणा ॥ १ ॥
जितुक्या मूर्ती तितुक्या प्रकृती । सारिख्या नस्ती आदिअंतीं ।
नेमाचि नाहीं पाहावें किती । काये म्हणोनि ॥ २ ॥
कित्येक म्लेंच होऊन गेलें । कित्येक फिरंगणांत[2] आटले[3] ।
देशभाषेनें रुधिले । कितीयेक ॥ ३ ॥

---

१ आयुष्य. २ फिरंगी लोकाचा देश ३ नाडले.

मऱ्हाष्ट्रदेश थोडा उरला। राजकारणें लोक रुधिला।
अवकाश नाहीं जेवायाला। उदंड कामें ॥ ४ ॥

कित्येक युद्धप्रसंगीं गुंतले। तेणें गुणें उन्मत्त जाले।
रात्रंदिवस करूं लागले। युद्धचर्चा ॥ ५ ॥

उदिम्यास[1] व्यासंग लागला। अवकाश नाहींसा झाला।
अवघा पोटधंदाच लागला। निरंतर ॥ ६ ॥

शडदर्शनें[2] नाना मतें। पाषांडें वाढलीं बहुतें।
पृथ्वीमधें जेथतेथें। उपदेसिती ॥ ७ ॥

स्मार्थी आणि वैष्णवीं। उरलीं सुरलीं नेलीं आघर्वीं।
ऐसी पाहातां गथागोंवी। उदंड जाली ॥ ८ ॥

कित्येक कामनेचे भक्त। ठाइं ठाइं जाले आसक्त।
युक्त अथवा अयुक्त। पाहातो कोण ॥ ९ ॥

या गलबल्यामधें गलबला[3]। कोणी कोणी वाढविला।
त्यास देखों सकेनासा जाला। वैदिक लोक ॥ १० ॥

त्याहिमधें हरिकीर्तन। तेथें वाढले कित्येक जन।
प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान। कोण पाहे ॥ ११ ॥

याकारणें ज्ञान दुल्लभ। पुण्यें घडे अलभ्य लाभ।
विचारवंतां सुल्लभ। सकळ कांहीं ॥ १२ ॥

विचार कळला सांगतां नये। उदंड येती अंतराये।
उपाय योजितां अपाये। आडवे येती ॥ १३ ॥
त्याहिमधें जो तिक्षण। रिकामा जाऊं नेदी क्षण।
धूर्त तार्किक विचक्षण। सकळां मानें ॥ १४ ॥

---

१ व्यापारी २ सहा दर्शनें. ३ गडबड. ४ तीव्रबुद्धीचा

नाना जिनस[1] उदंड पाठ । वदों लागला घडघडाट ।
अफाट[2]चि केली वाट । सामर्थ्यबळें ॥ १५ ॥

प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें । जाणे सकळांचीं अंतरें ।
निरूपणें तदनंतरें । चटक लागे ॥ १६ ॥

मतें मतांतरें सगट । प्रत्यय[3] बोलोन करी सपाट ।
दंडक[4] सांडून नीट । वेधी जना ॥ १७ ॥

नेमकें भेदकें वचनें । अखंड पाहे प्रसंगमानें ।
उदास वृत्तीच्या गुमानें[5] । उठोन जातो ॥ १८ ॥

प्रत्यये बोलोन उठोन गेला । चटक लागली लोकांला ।
नाना मार्ग सांडूनि त्याला । शरण येती ॥ १९ ॥

परी तो कोठें आडळेना । कोणे स्थळीं सांपडेना ।
वेष पाहतां हीनदीना । सारिखा दिसे ॥ २० ॥

उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ।
तेथें येशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ २१ ॥

ठाइं ठाइं भजन लावी । आपण तेथून चुकावी ।
मत्सर मतांचीं[6] गोवी । लागोंच नेदी ॥ २२ ॥

खनाळामधें जाऊन राहे । तेथें कोणीच न पाहे ।
सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ २३ ॥

अवघड स्थळीं कठीण लोक । तेथें राहणें नेमक ।
सृष्टीमधें सकळ लोक । धुंडीत येती ॥ २४ ॥

तेथें कोणाचें चालेना । अणुमात्र अनुमानेना ।
कट्ट[7] घालून राजकारणा । लोक लावी ॥ २५ ॥

---

१ वेंचे. २ अफाट, विस्तीर्ण. ३ अनुभव. ४ रूढि. ५ जोराने. ६ दऱ्या, दुर्घटस्थळें. ७ निश्चय.

लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले ।
भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥ २६ ॥

ठाइं ठाइं उदंड तांबे । मनुष्यमात्र तितुके झोंबे ।
चहुंकडे उदंड लांबे । परमार्थबुद्धी ॥ २७ ॥

उपासनेचा गजर । स्थळोस्थळीं थोर थोर ।
प्रत्ययानें प्राणीमात्र । सोडविले ॥ २८ ॥

ऐसे कैवाडे उदंड जाणे । तेणें लोक होती शाहाणे ।
जेथें तेथें प्रत्यय बाणे । प्राणिमात्रांसी ॥ २९ ॥

ऐसी कीर्ति करून जावें । तरीच संसारास यावें ।
दास म्हणे हें स्वभावें । संकेतें बोलिलें ॥ ३० ॥

दा. १९. २. १–३०.

## ५. उपसंहार.

८४. " समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध. "

जालें साधनाचें फळ । संसार जाला सफळ ।
निर्गुण ब्रह्म तें निश्चळ । अंतरीं बिंबलें ॥ २६ ॥

हिसेब जाला मायेचा । जाला निवाडा तत्वांचा ।
साध्य होतां साधनाचा । ठाव नाहीं ॥ २७ ॥

स्वप्नीं जें जें देखिलें । तें तें जागृतीस उडालें ।
सहजचि अनुर्वाच्य जालें । बोलतां नये ॥ २८ ॥

ऐसें हें विवेकें जाणावें । प्रत्ययें खुणेसी बाणावें ।
जन्ममृत्याच्या नांवें । सुन्याकार ॥ २९ ॥

---

१ समुदाय. २ प्रकार, युक्त्या.

भक्तांचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें ।
समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥ ३० ॥

वीस दशक दासबोध । श्रवणद्वारें घेतां शोध ।
मननकर्त्यास विशद । परमार्थ होतो ॥ ३१ ॥

वीस दशक दोनीसे समास । साधकें पाहावे सावकास ।
विवरतां विशेषाविशेष । कळों लागे ॥ ३२ ॥

ग्रंथाचें करावें स्तवन । स्तवनाचें काये प्रयोजन ।
येथें प्रत्ययास कारण । प्रत्ययो पाहावा ॥ ३३ ॥

देहे तंव पांचा भूतांचा । कर्ता आत्मा तथींचा ।
आणी कवित्वप्रकार मनुशाचा । काशावरूनी ॥ ३४ ॥

सकळ करणें जगदीशाचें । आणी कवित्वचि काय मानुशाचें ।
ऐशा अप्रमाण बोलण्याचें । काये घ्यावें ॥ ३५ ॥

सकळ देह्याचा झाडा केला । तत्वसमुदाव उडाला ।
तेथें कोण्या पदार्थाला । आपुलें म्हणावें ॥ ३६ ॥

ऐसीं हे विचाराचीं कामे । उगेच भ्रमों नये भ्रमें ।
जगदेश्वरें अनुक्रमें । सकळ केलें ॥ ३७ ॥

दा. २०. १०. २६–३७.

---

१ दोनशे.

# रामदासवचनामृत

## भाग दुसरा



संकीर्ण संग्र

# रामदासवचनामृत

( संकीर्ण ग्रंथ )

## ६ जुना दासबोध.

### ८९. देह पडे कां देव जोडे !

निग्रहनेमाचें बळ । असतां प्राप्ति तात्काळ ।
दुराशा करी तळमळ । निग्रहभ्रष्टों ॥ १३ ॥

जेथें निग्रहेसीं धार्ष्ट्य वसे । तेथें देव सन्निधचि असे ।
सोडी संशयाचें पिसें । एतद्विषयीं ॥ १४ ॥

तरी निग्रह धारिष्ट जडे । हें वैराग्येंवीण न घडे ।
दृढ वैराग्य होतां उडे । पांग देहाचा ॥ १५ ॥

देह पडे कां देव जोडे । ऐशी हांव आंगीं जडे ।
तेणें गुणें वैराग्य घडे । महाप्रबळ ॥ १७ ॥

देहपांग[1] निःशेष भंगे । तव्हां प्राप्तीसी वेळ नलगे ।
देव भक्तापाठीं लागे । "नाभी नाभी" म्हणोनि ॥ १८ ॥

बाळक आपणा रक्षूं नेणे । म्हणोनि मातेसि लागे रक्षणें ।
तेंचि बाळक शहाणें । होतां माता विसंबे ॥ १९ ॥

तैसा भक्त भगवंतीं प्रेमा । लावूनि उल्लंघी देहसीमा ।
तयाचा सांभाळ आत्मयारामा । करणें घडे नेमस्त ॥ २० ॥

---

१ इच्छा. २ भिऊं नको. ३ दुर्लक्ष करणें.

सर्वस्वाची आस तुटे । तरीच सगुणमूर्ति प्रगटे ।
दुःख संसारींचें फिटे । एकसरा ॥ २१ ॥

जु. दा. ७. १३–२१.

## ८६. प्रपंचपरमार्थ.

गृहासी आग लागली । देखोनि कां बोंब केली ।
लोकांची मांदी मेळविली । आगी विझवाया कारणें ॥
तैसीं परमार्थीं बोंब मारावी । कांहीं काढाकाढी करावी ।
हळू हळू सोडवावी । मिठी प्रपंचाची ॥
प्रपंचधुडका[1] पेटला । मध्यें परमार्थ जळोनि गेला ।
ऐसें देखोनि तुम्हांला । कैसें बरें वाटत ॥
मुक्ताफळ आणि दिव्यांबर । नाना वस्तूंचें भांडार ।
भस्म करूनि वैश्वानर । विझोनि जाई जंवीं ॥
तैसा प्रपंच हा परमार्थासी । जाळोनि भागूं नेदी आपणांसी ।
आयुष्य गेलियां प्राणियासी । विमुख होय ॥
जरी हा प्रपंच शाश्वत जाणतां । तरी आम्हीं यासीच धरितों ।
हा अशाश्वत म्हणोनि रडतां । तुम्हां भोंवतीं ॥
तुम्हीं कैसे रे परमार्थी । परघात आणि अपस्वार्थी ।
डोळे झांकूनि दोहीं अर्थीं । नागवलेत कीं रे ॥

जु. दा. ११. ९४–६०.

## ८७. अनुभव सांगूं नये.

आतांही जयास वाटे भेटावें । रामें मज सांभाळीत जावें ।
ऐसें दृढ घेतलें जीवें । तरी ऐका मी सांगेन ॥ ३७ ॥

---

१ अग्नि, वणवा

श्रीराम जयराम जयजयराम । ऐसा कांहीं एक करूनियां नेम ।
जप कीजे तेणें आत्माराम । जोडेल नियमें ॥ ३८ ॥
परी कोणासी कळों नेदावा । जप अंतरींच करावा ।
जैसा कृपणासी धनठेवा । सांपडला एकांतीं ॥ ३९ ॥
राम जपे त्याचें चित्त पाहतां । जप करितां शीण येतां ।
विकल्प[1] अंतरीं प्रवेशतो । तरी ढळेना मेरू जैसा ॥ ४० ॥
कां प्रपंचीं होती थोर आघात । तेणें चित्त होय दुश्चित ।
देहासी आपदा होती अत्यंत । तरी रामासि विसरूं नये ॥४१॥
जप नेमिला तो चुकों नेदावा । त्यावेगळा सर्वदा स्मरावा ।
मळत्यागींही न विसंबावा । कर्मठपणें करूनि ॥ ४२ ॥
ऐसें अखंड नाम स्मरावें । परी दुसरियासी कळों नेदावें ।
निदिध्यास लागलियां राघवें । पाविजे तात्काळ ॥ ४३ ॥
वैरें निदिध्यास रावणें केला । त्याचा संकल्प त्यासी फळला ।
मा जेणें दास्यत्वें उपासिला । तो राम कैसा नव्हे ॥ ४४ ॥
कांहीं साक्षात्कार झाला । तो सांगों नये दुसरियाला ।
जरी ओ[2]ळकेपणें सांगितला । तरी पुन्हां होणार नाहीं ॥ ४५ ॥
पुन्हां साक्षात्कार कैंचा । जाला तरी वरपंगाचा[3] ।
हा मी आपुले जीवाचा । अनुभव सांगतां ॥ ४६ ॥

जु. दा. १९. ३७–४६.

## ८८. रामास मागणें.

रामासि इतुकें मागावें । जें आपण रामचि व्हावें ।
कां रामासि दास करावें । आपणा ऐसें ॥

१ संशय. २ अशाळभूतपणा, मूर्खपणा. ३ वरवरचा दिखाऊ.

तूं ऐसा कां मीच असोन । त्याहून नलगे आम्हांसि आन ।
तुझ्या ठायीं दासपण । आणीन तरी मी होय ॥ ६:८९]

तुवां स्वामी होऊनि बैसावें । आणि आम्हांसभोंवतें भोंवावें ।
रागेजोनी बाहेतां[1] न यावें । हें काय बरें ॥

तूं राज्य सांडुनियां जालियां उदास । तरी आम्हींही तुझेचि दास ।
तां काय बोलिजेल बापास । तैसें आम्हींही तुज करूं ॥

तुवां पाषाण तारिले । तरी आम्हींही जडजीव उद्धरिले ।
तुवां देव मुक्त केले । बंधनापासूनी ॥

तरी आम्हींही भाविकांसी । सोडवूनियां मोक्षपदासी ।
पावविलें तयांसी । मागुता जन्म नाहीं ॥

तुवां जरामरण केलें दुरी । तें मुळींच नाहीं आमुचे घरीं ।
तूं राजा अकरा सहस्रवरी । तरी आम्हांसी संख्या नाहीं ॥

तुवां पुरी नेली वैकुंठा । आम्हीं वैकुंठींच्या बारा वाटा ।
करूनि मांडिला चोहेटा[2] । तया वैकुंठाचा ॥

ऐसे बोलती रामदास । निधडे सर्वस्वें उदास ।
वैभव वाटे जयांस । कसपट जैसें ॥

ऐसें बोलणें ऐकिलें । रामें मंदहास्य केलें ।
धांवोनियां हृदयीं धरिलें । आपुलिया निजदासा ॥

ऐसा भक्ताचा वेळाइत[3] । दासाभोंवता भोंवत ।
एक क्षणीं न विसंबत । भावार्थ देखोनि भुलला ॥

राम दासांमध्यें उभा । तेणें दासांसी आली शोभा ।
रामस्वरूपाची प्रभा । कोंदाटली सबाह्य ॥

---

१ हाक मारणे. २ चवाटा. ३ वेळेनुसार काम करणारा, आज्ञाधारक शिपाई.

रामें आपणांसारिखें केलें । दास दासपणंसी मुकले ।
रामासि मिळोनि एकचि जाले । एकपणाही वेगळे ॥
स्वामीसेवकपणें आनंदले । हर्षेकरुनि उचंबळले ।
परस्परें गिळोनि ठेले । लोभ[1] आला म्हणोनि ॥
ऐसें देवाभक्तांचें सांजणें । जीव घेणें जीव देणें ।
पुन्हां मागुतें येणें जाणें । न घडे कदा ॥
नवविधा भक्ति याचिकारणें । जें आपण स्वयें रामचि होणें ।
स्वयेंचि रामपणें ठाकणें । स्वानुभवें करूनी ॥

जु. दा. १६. १–१६.

## ७ मनाचे श्लोक.

---

### ८९. मनास प्रार्थना.

मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ।
तरी श्रीहरि पाविजे तो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें सर्व सोडूनि द्यावें ।
जनीं वंद्य तें सर्वभावें करावें ॥ २ ॥

प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।
पुढें वैखरी राम आधीं वदावा ॥
सदाचार हा थोर सांडूं नये तो ।
जनीं तोचि तो मानवीं धन्य होतो ॥ ३ ॥

देहे त्यागितां कीर्ति मागें उरावी ।
मना सज्जना हेचि क्रीया धरावी ॥

---

१ प्रीति, सख्य.

मना चंदनाचे परी तां झिजावें ।
परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ ८ ॥

मना पाहतां सत्य हे मृत्यभूमी ।
जितां बोलती सर्वही जीव मी मी ॥
चिरंजीव हे सर्वही मानिताती ।
अकस्मात सांडूनियां सर्व जाती ॥ १५॥

भवाच्या भयें काय भीतोस लंडी ।
धरीं रे मना धीर धाकासि सांडी ॥
रघूनायकासारिखा स्वामि शीरीं ।
नुपेक्षी कदा कोपल्यां दंडधारी ॥ २७ ॥

समर्थाचिया सेवका वक्र पाहे ।
असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही ।
नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ ३० ॥

असे हा जया अंतरीं भाव जैसा ।
वसे हा तया अंतरीं देव तैसा ॥
अनन्यास रक्षीतसे चापपाणी ।
नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ ३५ ॥

सदा सर्वदा देव सन्नीध आहे ।
कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे ॥
सुखानंद आनंद कैवल्यदानी ।
नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ ३६ ॥

---

१ त्वा. २ जिवंत असतांना. ३ देणारा, दान करणारा.

सदा चक्रवाकासि मार्तंड[1] जैसा।
उडी घालितो संकटीं स्वामि तैसा॥
हरीभक्तिचा घाव गाजे निशाणीं[2]।
नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥ ३७॥

जयाचेनि संगें समाधान भंगे।
अहंता अकस्मात् येऊनि लागे॥
तये संगतीची जनीं कोण गोडी।
जये संगतीनें मती राम सोडी॥ ४५॥

सदा देवकार्जीं झिजे देह ज्याचा।
सदा रामनामें वदे नित्य वाचा॥
स्वधर्मेचि चाले सदा उत्तमाचा।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥ ४८॥

मना राम कल्पतरु कामधेनु।
निधी सार चिंतामणी काय वानूं॥
जयाचेनि योगें घडे सर्व सत्ता।
तया साम्यता कायसी कोण आतां॥ ६०॥
उभा कल्पवृक्षातळीं दुःख वाहे।
तया अंतरीं सर्वदा तेंचि आहे॥
जनीं सज्जनीं वाद हा वाढवावा।
पुढें मागुता शोक जीवीं धरावा॥ ६१॥
घनशाम हा राम लावण्यरूपी।
महां धीर गंभीर पूर्णप्रतापी॥
करी संकटीं सेवकांचा कुढावा[3]।
प्रभाते मनीं राम चिंतीत जावा॥ ६७॥

१ सूर्य. २ नौबद, नगारा. ३ संरक्षण

जनीं भोजनीं नाम वाचे वदावें।
अती आदरें गद्य घोषें म्हणावें॥
हरीचिंतनें अन्न जेवीत जावें।
तरी श्रीहरी पाविजे तो स्वभावें॥ ८९॥

गजेंद्र महां संकटीं वास पाहे।
तया कारणें श्रीहरी धांवताहे॥
उडी घातली जाहला जीवदानी।
नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी॥ ११८॥

नसे पीत ना श्वेत ना शाम कांहीं।
नसे वेक्त आवेक्त ना नीळ नाहीं॥
म्हणे दास विश्वासतां मुक्ति लाहे।
मना संत आनंत शोधूनि पाहें॥ १५०॥

दिसेना जनीं तेंचि शोधूनि पाहें।
बरें पाहतां गूज तेथेंचि आहे॥
करीं घेउं जातां कदा आढळेना।
जनीं सर्व कोंदाटलें तें कळेना॥ १५५॥

विधी निर्मितां लीहितो सर्व भाळीं।
परी लीहिता कोण त्याचे कपाळीं॥
हरु जाळितो लोक संव्हारकाळीं।
परी शेवटीं शंकरा कोण जाळी॥ १७५॥

तिन्ही लोक जेथूनि निर्माण जाले।
तया देवरायासि कोण्ही न बोले॥
जगीं थोरला देव तो चोरलासे।
गुरूवीण तो सर्वथाही न दीसे॥ १७९॥

नभासारिखें रूप या राघवाचें ।
मनीं चिंतितां मूळ तूटे भवाचें ॥
तया पाहतां देहबुधी उरेना ।
सदा सर्वदा आर्त पोटीं पुरेना ॥ १९७ ॥

## ८. पंचसमासी.

### १०. स्वरूपानुसंधान.

हें नवविध भजन । सायुज्यमुक्ति साधन ।
तेणें करितां शुद्ध ज्ञान । प्राण्यास होय ॥ १८ ॥

शुद्ध ज्ञानाचे बळें । अंतरीं वैराग्य प्रबळे ।
तेणें लिंगदेह मोकळें । होय वासनेसीं ॥ १९ ॥

लागे स्वरूपानुसंधान । नाठवे देहाभिमान ।
विश्रांतीतें देखे मन । तद्रूप होय ॥ २० ॥

आदिपुरुष एकला । नाहीं द्वैताचा गलबला ।
संगत्यागें अवलंबिला । शुद्ध एकांत ॥२१ ॥

तेथें मन पांगुळलें[१] । आपणांस विसरलें ।
आपणास भुलोन गेलें । स्वरूपबोधें ॥२२ ॥

मी कोण हें न कळे । अवघा आत्मा प्रबळे ।
तेणें बळें मन मावळे । कर्पूरन्यायें[२] ॥२३ ॥

तेथें शब्द कुंठित झाला । अनुभव अनुभवीं निमाला ।
आतां असो हा गलबला । कोणी करावा ॥ २४ ॥

१ पांगुळणें होणें. २ कर्पूरअग्निन्याय.

वाटे एकांतासी जावें। पुनः हें अनुभवावें।
उगें निवांत असावें। कल्पकोटी॥ २५॥

नको वक्तृत्व उपाधि। पांगुळली स्वरूपीं बुद्धि।
लागली सहज समाधि। हेतुरहित॥ २६॥

गुरु शिष्य एक झाले। अनुभवबोधीं बुडाले।
त्यांचे शुद्धीस जे गेले। तया तीच गती॥२७॥

तुटला संसारबंधु। आटोनि गेला भवसिंधु।
बुडाला बोधीं प्रबोधु। विवेकबळें॥ २८॥

ज्ञानाग्नि प्रगट झाला। मायाकर्पूर जळाला।
विवेकें अविवेक ग्रासिला। तये ठायीं॥ २९॥

झालें साधनाचें फळ। चुकलें जन्माचें मूळ।
निष्कलंक आणि निर्मळ। तोचि आत्मा॥ ३०॥

पं. स. ४. १८–३०.

## ९१. सर्वत्र रामदर्शन.

एवं ज्ञाता समाधानी। प्रारब्धयोगें वर्ते जनीं।
परि अनुसंधान मनीं। वेगळेंचि॥ ५

वृत्ति गुंतली स्वानुभवें। जनीं तेंचि भासे आघवें।
सबाह्य व्यापिलें देवें। ब्रह्मांड अवघें॥ ६॥

वृत्ति मुळाकडे पाहे। त्यास राम दिसताहे।
स्तब्ध होवोनियां राहे। रामचि दिसे॥ ७॥

मन मुरडे आटे। तंव मार्गीं राम भेटे।
मागें पुढें प्रगटे। रामचि अवघा॥ ८॥

दाही दिशा अवलोकितां । रामचि भासे तत्वतां ।
वदन चुकवूं जातां । सन्मुख राम ॥ ९ ॥

राम झालिया सन्मुख । कल्पांतीं नोहे विन्मुख ।
नेत्र झाकितां अधिक । रामचि दिसे ॥ १० ॥

मग विसरोनि पाहिलें । तंव तें रामचि झालें ।
जीव सर्वस्वें वेधले । संपूर्ण रामें ॥ ११ ॥

मग आपणा पाहे । तंव रामचि झाला आहे ।
उभय साक्षी जो राहे । तोचि राम ॥ १२ ॥

रामेंविण सर्वथा कांहीं । अणुमात्र रितें नाहीं ।
दृश्य द्रष्टा दर्शन तेंही । रामचि भासे ॥ १३ ॥

प्रपंच सारिला मानसें । दृढ लागलें रामपिसें ।
देह वर्ते भ्रमिष्ट जेसें । पिशाचवत् ॥ १४ ॥

रामरूपीं वेधलें मन । तेणें राहे कुलाभिमान ।
पूर्वदशेचें लक्षण । पालटोनि गेलें ॥ १५ ॥

ऐसी खूण सकळांस । सांगोनि गेला रामदास ।
सत्संगें जगदीश । नेमस्त भेटे ॥ ३३ ॥

पं. म. ९. ९–३३.

## ९. मानपंचक.



## ९२. रामराज्य.

राज्य या रघुनाथाचें । कळीकाळासी नातुडे ।
बहुवृष्टी अनावृष्टी । हें कदा न घडे जनीं ॥ ७ ॥

उद्वेग पाहतां नाहीं । चिंतामात्र नसे जनीं ।
व्याधी नाहीं रोग नाहीं । लोक आरोग्य नांदती ॥ ८ ॥

युध्य नाहिंच आयोध्या[1] । राग ना मछरु नसे ।
बंद निर्बंद ही नाहीं । दंड दोष कदा नसे ॥ ९ ॥

कुरूपी पाहतां नाहीं । जरा मृत्य असेचिना ।
आदरु सकळैं लोकां । सख्यप्रीती परस्परें ॥ १० ॥

बोलणें सत्य न्यायाचें । अन्याय सहसा नसे ।
अनेक वर्तती काया । येक जीव परस्परें ॥ ११ ॥

दरिद्री धुंडितां नाहीं । मूर्ख हा तो असेचिना ।
परोपकार तो मोठा । सर्वत्र लोकसंग्रहो ॥ १२ ॥

अद्भुत पीकती भूमी । वृक्ष देती सदा फळें ।
अखंड दुभती धेनु । आरोग्यें वाहती जळें ॥ १३ ॥

जळजें स्वापदें पक्षी । नाना जीव भुमंडळीं ।
आनंदरूप बो[2]भाती । नाना स्वर परस्परें ॥ १४ ॥

नद्या सरोवरें बावी[3] । डोलती नूतनें बनें ।
फळती फुलती झाडें । सुगंध वनवाटिका ॥ १५ ॥

उदंड वसती ग्रामें । नगरें पुरेंचि पट्टणें ।
तीर्थें क्षत्रें नाना स्छानें । शिवाल्यें गोपुरें न्नरीं ॥ १६ ॥

मठ मठ्या पर्णशाळा । रुसी[4]आश्रम साजिरे ।
वेदशास्त्रधर्मचर्चा । स्नान संध्या तपोनिधि ॥ १७ ॥

चढता वाढता प्रेमा । सुखानंद उचंबळे ।
संतोष समस्तैं लोकां । रामराज्य भुमंडळीं ॥ १८ ॥

---

१ जेथें युद्ध नाहीं ती जागा. २ हांक मारणें. ३ विहिरी. ४ ऋषी.

हरिदास नाचती रंगीं । गायनें कीर्तनें बरीं ।
रागरग तानमानें । टाळबंधं विराजती ॥ १९ ॥
प्रबंद[1] कविता छंदें । धाटी मुद्रा परोपरीं ।
आन्वय जाड दृष्टांतें । गद्यें पद्योंचि औघडें ॥ २० ॥
नानायुक्ती नाना बुधी । नाना विद्या नाना कळा ।
नाना संगीत सामर्थ्यें । नाना वाद्यें परोपरीं ॥ २१ ॥
संमार्जनें रंगमाळा । पुष्पमाळा बहुविधा ।
केशरें धुशरें[2] गंधें । सुगंध करताळिका ॥ २१ ॥
सर्वही तोषले तोषें । नाम घोषेंचि गर्जती ।
पुरेना दिन ना रात्री । यात्रा पर्वें हरीकथा ॥ २३ ॥
दीपिका चंद्रजोती त्या । आर्त्या नीरांजनें जनें ।
रामराजा दयासिंधु । वोळला सेवकांवरी ॥ २४ ॥
रामदासीं ब्रह्मज्ञान । सारासार विचारणा ।
धर्मस्थापनेसाठीं । कर्मकांड उपासना ॥ २५ ॥

मा. पं. १.७–२५

## ९३. सर्व देव मिळून एकच.

कास या रघुनाथाची । धरितां सुख पावलों ।
इतर कष्टती प्राणी । थोर संसारसांकडीं ॥
सांकडीं तोडिलीं माझीं । राघवें करुणाळयें ।
पूर्वींच तुटली माया । दुःख शोक विसंचला ॥
सेवकु मानवीयांचे । कष्टती बहुतांपरीं ॥
सेविला देव देवांचा । तेणें मी धन्य जाहालों ॥

१ गद्यपद्य. २ बुक्का.

नीच हे मानवी प्राणी। नीचाश्रय कामा नये।
महत्कीर्ति श्रीरामाची। फावला महदाश्रयो॥

विबुधां आश्रय ज्याच्या। पावले बंदमोचनें[1]।
सेवकु मारुती ऐसा। त्याचा मी म्हणती जनीं।

निवाला सीव ज्या नामें। ज्या नामें वाल्मीक रुसी।
जें नाम सकळां तारी। तें नाम मज अंतरीं॥

देव हा सर्व अंतरात्मा। वात हा त्याजपासुनी।
वातसुत हनुमंतु। रामसेवक हा जनीं॥

सीव तो राघवा ध्यातो। राम ध्यातो सदासीवा।
सख्यत्वें चालती दोघे। प्रसीध ठाउके जनीं॥

शक्ती ते शक्ती सीवाची। सीवशक्ती समागमें।
औंश जे चंद्रमौळीचे। ते सर्व प्रभुचे सखे॥

येकची अंश विष्णूचे। देवमात्र भुमंडळीं।
येकांशें चालती सर्वै। यालागीं सर्व एकची॥

ऐकती येकमेकांचें। येकमेकांसी पाहाती।
जन्मले जीव ते सर्वै। एक देवची वर्तवी॥

रामउपासना ऐसी। ब्रह्मांडव्यापिनी पाहा।
राम कर्ता राम भोक्ता। रामरूप वसुंधरा॥

विषयो जाहला देवो। नाना सुखें विळासवी।
नाना दुःखें देव कर्ता। त्रासकें शरीरें धरीं॥

भुजंगें डंखितां देव। देव जाला धन्वंतरी।
तारिता मारिता देव। बोलती ते येणें रिती॥

---

१ कारागृहातून सुटका.

शत्रु मित्र देव जाला । सुखदुःखें परोपरीं ।
येकासी हांसवी देवो । येकासी रडवीतसे ॥

येकासी भाग्य दे देवो । येकासी करंटं करी ।
सर्व कर्तव्यता तेथें । येथें शब्दाचि खुंटला ॥

शब्दज्ञान सरों आलें । ज्ञान सर्वत्र संचलें ।
जाणती जाणते ज्ञानी । मौन्यगर्भ विचारणा ॥

मानपंचक ४. १–२९.

## १०. निर्गुणध्यान.

### ९४. परममार्गाचें वर्णन.

चक्षूचें देखणें सरे । ज्ञानदृष्टि पाहोनि विरे ।
देखणेंपणेंविण उरे । सर्वांगदेखणा ॥ ५२ ॥

अखंड चक्षु अर्धोन्मीलित । सकळ देखण्याचा प्रांत ।
जेथें अगोचरासहित । मुद्रा आटती ॥ ५३ ॥

श्रवण मनन निजध्यास । साक्षात्कारें जडे विश्वास ।
परमानंद सावकाश । होइजे स्वयें ॥ ५४ ॥

मुमुक्षु साधक सिद्ध झाले । तेही येणेंचि मार्गें गेले ।
निखळ[1] सुखें सुखावले । महानुभाव ॥ ५५ ॥

योगी वीतरागी उदास । चतुर्थाश्रम जो संन्यास ।
दिगंबर नाना तापस । येणेंचि मार्गें ॥ ५६ ॥

जोगी जंगम आणि सोपी । फकीर कलंदर नानारूपी ।
येणेंचि मार्गें स्वरूपीं । पावती सकळ ॥ ५७ ॥

---

१ श्रेष्ठ.

ऋषी मुनी आणि सुरवर । आदि करूनियां हरिहर ।
यणेंचि मार्गें पैलपार । जावती सकळ ॥ ५८ ॥

मागां जाहाले आतां होती । होऊनि नाहीं पुनरावृत्ति ।
ऐसी अभंग ऐक्यस्थिति । वर्तल्यासहित ॥ ७० ॥

सकळ भक्त मिळाले । हरिहरब्रह्मादि आले ।
ऐक्यरूपें राम जाले । रामेंसाहित ॥ ७० ॥

जितुकें दृश्य साकार । आहे अंनमेय[१] अपार ।
तेंचि उसळलें धूसर । रक्त श्वेत सुगंध ॥ ७२ ॥

पंचभूतीं कर्पूरगोळ । ज्ञानरूपं झाला प्रबळ ।
ओवाळूनियां सकळ । निवांत झाले ॥ ७३ ॥

गेला कर्पूर जळोनि । राहिला अनुहतध्वनि ।
ऐक्यरूपें समाधानी । सकळ राहिले ॥ ७४ ॥

नि. ध्या. ६४–७४.

## ११ जनस्वभावगोसावी.

—— ——

### ९५. भोंदू गुरूंचें वर्णन.

अनीती अविवेकी अन्यायी । अभक्त अधर्म लंडाई ।
वेदशास्त्र करील काई । तया मूर्खासी ॥ १ ॥

कर्माच्या ठाईं अनादर । नाहीं सगुण साक्षात्कार ।
ज्ञान पहातां अंधार । निश्चय नाहीं ॥ २ ॥

उगाच गोष्टी ऐकिल्या । मना आल्या त्या धरिल्या ।

---

१ अमेय.

रत्नें सोडून एकवटिल्या । शुंभा जैशा ॥ ३ ॥

फाल्गुन मासींचा खेळ । जैसा अवघा बाष्कळ ।
तेथें पाहोनि निर्मळ । काय घ्यावें ॥ ४ ॥

प्रत्ययज्ञानेंविण । करी अनुमानाचा शिण ।
शत्रु आपणासि आपण । होऊन राहे ॥ ५ ॥

त्यासी कोणे उमजवावें । मानेल तिकडे न्यावें ।
आंधळें गुरूं स्वभावें । धांवें चहूंकडे ॥ ६ ॥

जिकडे तिकडे ज्ञान झालें । उदंड गोसावी उतले ।
तयांचे संगतीं झाले । बाष्कळ प्राणी ॥ ७ ॥

भ्रष्ट ओंगळ अनाचारी । कुकर्मी अनुपकारी ।
विचार नाहीं अविचारी । जेथें तेथें ॥ ८ ॥

गर्भांधा कैंची परीक्षा । दीक्षाहीनासी दीक्षा ।
प्रमाण मानी प्रत्यक्षा । विवेकहीन ॥ ९ ॥

कशापासून काय झालें । ब्रह्मांड कोणी निर्मिलें ।
कांहीं न कळतां भुंकलें । गाढव जैसें ॥ १०

जें वेदशास्त्रीं मिळेना । अध्यात्म कांहीं कळेना ।
माजला बोका आकळेना । रेडा जैसा ॥ ११ ॥

कोण दीक्षा आहे कैसी । अविवेक स्थिति ऐसी ।
न पाहतां वसवसी । श्वान जैसें ॥ १२ ॥

ऐसे प्रकारींचे जन । चित्तीं अवघा अनुमान ।
प्रतीतीविण ज्ञान । उगेंच बोले ॥ १३ ॥

१ गोवऱ्या. २ मातले. ३ मूर्ख, वटवट करणारा. ४ गुरगुरणे.

लक्षण नेणे अवलक्षण । भाग्य नेणे करंटपण ।
ज्ञान नेणे अज्ञान । परम अन्यायी ॥ १४ ॥

एक उपदेश घेती । देवतार्चन टाकून देती ।
धर्मनीति बुडविती । महापाषांडी ॥ १५ ॥

म्हणती आमुचा गुरु । तयाचा अगाध विचारु ।
तेथें अवघा एकंकारु । भेद नाहीं ॥१६ ॥

एक म्हणती गुरु आमुचा । करी अंगिकार विष्ठेचा ॥
तयासारिखा दुजा कैंचा । भूमंडळीं ॥१७ ॥
एक म्हणती एकचि तो । अखंड ओक वर्पितो ।
बरें वाईट पाही तो । गोसावी कैंचा ॥ १८ ॥

अंगीकार करी सौख्याचा । तो गोसावी काशाचा ।
पहा गोसावी आमुचा । गुहाडींत लोळे ॥ १९ ॥

ओक नरक आणि मूत । निःशंक घटघटां घेत ।
लोकांमध्यें मोठा महंत । तया म्हणावें ॥ २० ॥

ओंगळपणाची स्थिती । स्वयें ओंगळ करिती ।
शुचिष्मंत महापंडितीं । मानिजेना ॥ २१ ॥

बरें जैसें जैसें मानलें । तैसें तैसें घेतलें ।
येथें आमुचें काय गेलें । होईना कां ॥ २२ ॥

एक म्हणती अगळा । भूताळा आणि देवताळा ।
जनांमध्यें आग्या वेताळा । चेतऊं जाणें ॥ २३ ॥

म्हणती आमुचा गुरु । जाणे चेटकाचा विचारु ।
भूतें घालून संहारु । समर्थ असे ॥२४ ॥

---

५ औरपणें, खादाड रीतीनें खाणे.

म्हणती आमुच्या घरीं। मोठी विद्या पंचाक्षरी।
चेडें चेटकीं नानापरी। लोकांमध्यें ॥ २५ ॥

अखंड राहे स्मशानीं। सटवी मेसका मावशाणी।
नाना कुजंत्रें येथुनी। शिकोनि जावीं ॥ २६ ॥

एक म्हणती गोसावी। गारुड्यास वेड लावी।
त्याचे सर्पचि पळवी। चहूंकडे ॥ २७ ॥

कुसळी विद्या दृष्टिबंधन। तत्काळ सभामोहन।
उच्चाटण आणि खिळण। मोहनी विद्या ॥ २८ ॥

आमुचे गोसावी महायोगी। औषधें देती जगालागीं।
नपुंसक वनिता भोगी। चमत्कारें ॥ २९ ॥

आमुचा गोसावी साक्षेपें। अखंड करिती सोनें रुपें।
अंजन साधन त्यापें। काय उणें ॥ ३० ॥

मोठा बडिवार गुरूचा। विंचू उतरी ठाईंचा।
तैसाचि उतार सर्पाचा। ठाईंचा होय ॥ ३१ ॥

जंबुक मुसकें खिळावीं। चोरटीं करावी वोणवीं।
अखंड भूतें राबवावीं। नाना जिनसीं ॥ ३२ ॥

आमुचा गुरु गुप्त होतो। दुजे दिवशीं उमटतो।
अचेतन चालवितो। मोठा ज्ञानी ॥ ३३ ॥

व्याघ्रावरी निःशंक। हातीं सर्पाचा चाबुक।
वांचले होते सहस्र एक। सामर्थ्यबळें ॥ ३४ ॥

दांत पाडोनी निघाले। पांढरे केश काळे झाले।
किती आले आणि गेले। गोसाव्यादेखतां ॥ ३५ ॥

---

६ कपटविद्या. ७ उद्गीर.

धारबंद नजरबंद । नाना घुटके काम बंद ।
पोर मोहरे नाना बंद । नाना प्रकारें ॥ ३६ ॥
अग्नीमध्यें परी जळेना । लोकांमध्यें परी कळेना ।
देखतां देखतां अस्माना[1] । वेधून जाय ॥ ३७ ॥
जाणें दुसऱ्याचें जीवींचें । वांझपण फेडिलें वांझेचें ।
मन विघडी दंपत्याचें । एकही करी ॥ ३८ ॥
त्याचें मोठें नवल कीं गा । मृत्तिकेच्या करी लवंगा ।
ब्राह्मण समंध अंगा । आणून दावी ॥ ३९ ॥
मातीची साखर केवळ । ढेंकळाचा करी गूळ ।
धोत्र्यांच्या बोंडांचीं केवळ । वाळकें करी ॥ ४० ॥
श्वास कोंडी दिशा कोंडी । पाडी तिडकेनें मुरकुंडी ।
धडा माणसाची मान वांकडी । करून मोडी ॥ ४१ ॥
ऐशापरीच्या करामती । भोंपळे पोटांत चढविती ।
मनुष्याचे पशु करिती । निमिषमात्रें ॥ ४२ ॥
गुरु भविष्य सांगती । रेड्याकरवीं वेद म्हणविती ।
गधड्याकरवीं पुराणें सांगविती । सामर्थ्यबळें ॥ ४३ ॥
कुतऱ्याकरवीं रागोद्धार । । कोंबड्याकरवीं तत्त्वविचार ।
खेचर आणि भूचर । सकळ बाधी ॥ ४४ ॥
घुटका घटकेनें करावा । फुटका कवडा वेचों न द्यावा ।
उदंड बचनाग साधावा । येकायेकीं ॥ ४५ ॥
वाळलीं काष्टें हिरवाळलीं[2] । आंधळीं डोळसें झालीं ।
पांगुळें धांवों लागलीं । चहूंकडे ॥ ४६ ॥

---

१ आकाश. २ हिरवी झाली, पल्लवित झाली.

गर्भिणीस कन्या कीं पुत्र । हें ठाउकें आहे यंत्र ।
गोसाव्यांनीं विद्यामात्र । अभ्यासिली ॥ ४७ ॥

भांडविद्या अभ्यासिली । तस्करविद्या कळों आली ।
विचारें पाहिली । वसुंधरा ॥ ४८ ॥

आमुचे गुरु अधिक गुणें । डोईचें करी रांधणें ।
लोकांचे नवस पुरवणें । नानाप्रकारें ॥ ४९ ॥

मेले प्राणी उठविले । साकरेचें मीठ केलें ।
गटगटां अग्नीस गिळिलें । काय सांगों ॥ ५० ॥

गोसावी समाधीस बैसला । दुसरे वेळे उघडून पाहिला ।
पूर्वेचा पश्चिमेस गेला । अकस्मात् ॥ ५१ ॥

लिंगाचे तुकडे तोडिती । कोटिलिंगें एकचि करिती ।
मोजवून दा¹ळी चारिती । पाषाणनंदी ॥ ५२ ॥

आसन घातलें जळावरी । पाहतां तो पैलतिरीं ।
आमुचा गुरु समुद्रावरी । चालत जातो ॥ ५३ ॥

पुरुषाची करी वनिता । वनितेचा पुरुष मागुता ।
अन्न खाऊन तत्वतां । दि²शा नाहीं ॥ ५४ ॥

नानाजिन्नसी अन्न खाणें । परी उदक नाहीं घेणें ।
शापून भस्माचि करणें । ऐसा गुरु ॥ ५५ ॥

अन्न उदंडचि खाणें । किंवा उपवास करणें ।
गोमुख तोंडें जेवणें । यथासांग ॥ ५६ ॥

गुरु वाघासी भेटला । वाघें चरचरा चाटिला ।
वस्त्रें बांधोनी आणिला । घरास वाघ ॥ ५७ ॥

---

१ डाळ २ शौच

गोसावी वाघ होतो । दुसऱ्या वाघासी मारितो ।
भुंकभुंकोनि मरतो । उतार नाहीं ॥ ५८ ॥

साधी बाळंतिणीची खापरी[1] । वोहरें[2] साधी नानापरी ।
तूप घे घागरीच्या घागरी । गुरु आमुचा ॥ ५९ ॥

मेल्या माशा उठविती । तुळसी देवावरी पाडिती ।
ऐशा नाना करामती । भूमंडळीं ॥ ६० ॥

अमुच्या गुरूची मोठी महंती । नाना अभक्ष भक्षिती ।
लोकांदेखतां फुलें करिती । मद्यमांसाचीं ॥ ६१ ॥

एक गोसावी पृथ्वीवरी । त्याची कोणी न पवे सरी ।
जेथें बैसे तेथें वोहरीं । सावकाश करी ॥ ६२ ॥

एक गोसावी महा भला । पोरीं वाळवंटीं पुरिला ।
येक तो पडोनिच राहिला । कित्येक दिवस ॥ ६३ ॥

येक गोसावी भाग्य देती । एक गोसावी पुत्र देती ।
गोसाव्यानें नवस चालती । नानाप्रकारें ॥ ६४ ॥

जें जें मनामध्यें चिंतावें । तें तें गोसाव्यांनीं जाणावें ।
चुकलें ठेवणें काढून द्यावें । नाना प्रकारें ॥ ६५ ॥

सुडक्यामध्यें[3] लाह्या भाजिती । थोड्या द्रव्यांचें उदंड करिती ।
पराचीं खबुत्रें नाचविती । नाना प्रकारें ॥ ६६ ॥

हारपलें सांपडून द्यावें । चोरटें तात्काळ धरावें ।
थोडें अन्न पुरवावें । बहुत जनांसी ॥ ६७ ॥

ऐसें वर्ततें लोकीं । येणें सार्थक नव्हे कीं ।
अध्यात्मविद्या विवेकी । जाणतसे ॥ ६८ ॥

---

१ कवची, परटी. २ जादूटोणा. ३ जुने फडके.

पिंडज्ञान तत्त्वज्ञान । आत्मज्ञान ब्रह्मज्ञान ।
पिंडब्रह्मांड सकळ शोधून । राहिलें जें ॥ ६९ ॥

पदार्थज्ञानाचा बडिवार । त्याहूनि थोर ईश्वर ।
ऐसे प्राणी लहान थोर । सकळ जाणती ॥ ७० ॥

ज. गो. १–७०.

## १२ राममंत्राचे श्लोक.



### ९६. हरे राम हा मंत्र सोपा जपा रे.

नको शास्त्रअभ्यास वित्पत्ति मोठी ।
जडे गर्व ताठा अभीमान पोटीं ।
कसा कोणता नेणवे आजपा रे ।
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

खुळे[1] हस्तपादादि हे भग्न होती ।
दिठी मंद होऊनियां कर्ण जाती ।
तनू कंप सर्वांगिं होती कळा रे ।
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

कफें कंठ हा रुद्ध होईल जेव्हां ।
अकस्मात् तो प्राण जाईल तेव्हां ।
तुला कोण तेथें सखे सोयरे रे ।
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

---

१ लुले.

दुराशा नको रे परस्त्रीधनाची।
नको तूं करूं नीच सेवा जनाची।
पराधीन कैसा मला दीससी रे।
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

नको योग अष्टांग तो रोध प्राणा।
नको कृच्छ्रचांद्रायणीं हट्ट जाणा।
अपभ्रंश हा मार्ग कीं वोखटा रे।
हरे राम हा मंत्र सोपा रे॥

तपस्वी मनस्वी भले पार गेले।
दुजी सृष्टिकर्ते असे थोर मेले।
चिरंजीव कल्पायु गेले किती रे।
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

नको सोंग छंदं करूं ढोंग कांहीं।
नको शिष्यशाखा मठीं सुख नाहीं।
महंतीमुळें नाश होतो तपा रे।
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

कलीं साधनें याविणें सर्व निंदीं।
हरे राम हा मंत्र जो त्यासि वंदीं।
हरे राम हे मालिका साधकां रे।
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

रा. श्लो. (८).

# १३ करुणाष्टकें.

## ९७. रघुनायेका मागणें हेंचि आतां.

उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी। अती आदरें सर्व सेवा करावी।
सदा प्रीति लागो तुझे गूण गातां। रघुनायेका मागणें हेंचि आतां ॥१॥
तुझें रूपडें लोचनीं म्या पहावें। तुझे गूण गातां मनासी रहावें।
उठो आवडी भक्तिपंथेंचि जातां। रघुनायेका मागणें हेंचि आतां ॥ २ ॥
मनीं वासना भक्ति तुझी करावी। कृपाळूपणें राघवें पूरवावी।
वसावें मज अंतरीं नाम घेतां। रघुनायेका मागणें हेंचि आतां ॥ ३ ॥
सदा सर्वदा योग तूझा घडावा। तुझे कारणीं देह माझा पडावा।
नुपेक्षीं मज गुणवंता अनंता। रघुनायेका मागणें हेंचि आतां ॥ ४ ॥
नको द्रव्यदारा नको येरझारा। नको मानसीं ज्ञानगर्वें फुगारा।
सगुणीं मज लाविं रे भक्तिपंथा। रघुनायेका मागणें हेंचि आतां ॥ ५ ॥
भवें व्यापलों प्रीति छाया करावी। कृपासागरें सर्व चिंता हरावी।
मज संकटीं सोडवावें समर्था। रघुनायेका मागणें हेंचि आतां ॥६॥
मनीं कामना कल्पना ते नसावी। कुबुद्धी कुडी वासना नीरसावी।
नको संशयो तोडिं संसारवेथा। रघुनायेका मागणें हेंचि आतां ॥७॥
समर्थापुढें काय मागों कळेना। दुराशा मनीं बैसली हे ढळेना।
पुढें संशयो नीरसीं सर्व चिंता। रघुनायेका मागणें हेंचि आतां ॥८॥
ब्रिदाकारणें दीन हातीं धरावें। म्हणे दास भक्तांसि रे उधरावें।
सुटो ब्रीद आम्हासि सांडूनि जातां। रघुनायेका मागणें हेंचि आतां ॥९॥

## ९८. उदासीन हा काळ कोठें न कंठे.

समाधान साधुजनाचेनि योगें। परी मागुतें दुःख होतें वियोगें।
घडीनें घडी सीण अत्यंत वाटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ १ ॥

घरें सुंदरें सौख्य नानापरीचें । परी कोण जाणेल तें अंतरींचें ।
मनीं आठवितांचि तो कंठ दाटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ २॥
बळें लावितां चित्त कोठें जडेना । समाधान तें कांहिं केल्या घडेना ।
नव्हे धीर नेनीं[1] सदा नीर लोटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ३ ॥
आवस्था मनीं लागली काय सांगों । गुणीं गुंतला हेत कोण्हासि मागों ।
बहुसाल भेटावया प्राण फूटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ४ ॥
कृपाळूपणें भेट रे रामराया । वियोगें तुझ्या सर्व व्याकूळ काया ।
जनामाजि लोकीक हा ही न सूटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे॥५॥
आहा रे विधी तां असें काय केलें । पराधेनता पाप माझें उदेलें ।
बहुतांमधें तूकतां[2] तूक तूटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ६ ॥
समर्था मनीं सांडि माझी नसावी । सदा सर्वदा भक्तचिंता असावी ।
घडेना तुझा योग हा प्राप्त खोटें । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ७ ॥
अखंडित हें सांग सेवा घडावी । न होतां तुझी भेटि काया पडावी ।
दिसेंदीस आयुष्य हें व्यर्थ आटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ८ ॥
भजा काय सर्वां परी हीण देवा । करूं काय रे सर्व माझाचि ठेवा ।
म्हणों काय मी कर्म रेखा न लोटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ९ ॥
म्हणे दास मी वास[3] पाहें दयाळा । रघुनायेका भक्तपाळा भुपाळा ।
पहावें तुला हें जिवीं आर्त[4] मोठें । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ १० ॥

## ९९. नसे भक्ति ना ज्ञान.

नसे भक्ति ना ज्ञान ना ध्यान कांहीं । नसे प्रेम हें रामविश्राम नाहीं ।
असा दीन अज्ञान मी दास तुझा । समर्था जनीं घेतला भार माझा ॥ १ ॥
रघुनायेका जन्मजन्मांतरींचा । अहंभाव छेदूनि टाकीं दिनाचा ।
जनीं बोलती दास या राघवाचा । परी अंतरीं लेश नाहीं तयांचा ॥ २ ॥

१ नयन, डोळा. २ वजन करणे. ३ वाट. ४ इच्छा.

दिनाचें उणें दीसतां लाज कोण्हा। जनीं दास दीसे तुझा दैन्यवाणा।
सिरीं स्वामि तूं रामपूर्णप्रतापी। तुझा दास पाहें सदा सीघ्रकोपी ॥ ३॥
रघुनायेका दीन हातीं धरावें। अहंभाव छेदूनियां उधरावें।
अगुणी तयालागीं गुणी करावें। समर्थे भवसागरीं उतरावें ॥ ४॥
किती भार घालूं रघुनायेकाला। मजकारणें सीण होईल त्याला।
दिनानाथ हा संकटीं धांव घालीं। तयाचेन हे सर्व काया निवाली ॥५॥
मज कोंवसा राम कैवल्यदाता। तयाचेन हे फीटली सर्व चिंता।
समर्था तया काय उत्तीर्ण व्हावें। सदा सर्वदा नाम वाचे म्हणावें ॥ ६॥

## १००. सर्वोत्तमा कैं मज भेट देसी.

दुःखानळें मी संतप्त देहीं। तुजवीण रामा विश्रांति नाहीं।
आधार तुझा मज मी विदेसीं। सर्वोत्तमा कैं मज भेटि देसी॥ १॥
प्रालब्ध खोटें आभिमान आला। स्वामी समर्था वियोग जाला।
तेणें बहु क्षीति वाटे मनासी। सर्वोत्तमा कैं मज भेटि देसी॥ २॥
तुझिया वियोगें बहु वेधना रे। विवेक नाहीं आम्हां दिनां रे।
पडिला समंधु या दुर्जनेसीं। सर्वोत्तमा कैं मज भेटि देसी॥ ३॥
संसारचिंता मज वाटते रे। रामा प्रपंचीं मन जातसे रे।
संसर्ग आहे इतरां जनासीं। सर्वोत्तमा कैं मज भेटि देसी ॥४॥

## १०१. रघुविरभजनाची.

रघुविरभजनाची मानसीं प्रीति लागो।
रघुविरस्मरणाची अंतरीं वृत्ति जागो।
रघुविरचरणाची वासना वास मागो।
रघुविरगुण गातां वाणि हे नित्य सांगों॥ १॥

---

१ रक्षण करणारा, आश्रय.

चतुरपण जनीं हें पाहतां आढळेना ।
निकट रघुविराचें रूप कैसें कळेना ।
चपळ मन वळेना गर्वताठा गळेना ।
तुजविण जगदीशा कर्मरेखा टळेना ॥ २ ॥

तरुणपण देह्याचें लोपतां वेळ नाहीं ।
तन मन धन अंतीं वोसरे सर्व कांहीं ।
सकळ जन बुडाले वेर्थ मायाप्रवाहीं ।
झडकरि सुमना रे हीत शोधूनि पाहीं ॥ ३ ॥

पळपळ चळताहे बाळ तारुण्य देहीं ।
तळमळ विषयांची नेणवे हीत कांहीं ।
लळलळ गरळा तो काळ लाळीत[1] आहे ।
जळजळ सितळा हे भक्ति सेऊनि राहे ॥ ४ ॥

दिनकरकुळवल्ली लोटलीं आंगभारें ।
रघुविरअवतारें दाटली थोरथोरें ।
सुखरूप सुखवासि राहिले योगरासी ।
सफळ सितळ छाया फावली रामदासीं ॥ ५ ॥

## १०२. जनीं जाणिजे योग हा सुकृताचा.

मनासारिखी सुंदरा ते अन्यया । मनासारिखे पुत्र ज्यामात कन्या ।
सदा सर्वदा बोलती रम्य वाचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥१॥

भलीं मायबापें भले मित्र बंधु । भले सोयरे राखती स्नेहवादु ।
मुलें लेंकुरें येक मेळा सुनांचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥२॥

भले धाकुटे थोरले सर्व कांहीं । भले गोत्रजु भिन्न भावार्थ नाहीं ।
अखंडीत हा काळ जातो सुखाचा।जनीं जाणिजे योग हा सुकृताचा॥३॥

---

१ लाळ टाकणें.

धनें धान्य पात्रें अळंकार चीरें[1]। विसोरें[2] घरें सुंदरें रम्य सारे ॥
देहे चालतो सर्व आरोग्य ज्याचा। जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥ ४ ॥

मनासारिखे ग्राम ग्रामाधिकारी। मनासारिखे लोक शोकापहारी।
मनासारिखा संग साधुजनाचा। जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥ ५ ॥

मनासारिखें चिंतितां देव पावे। मनासारिखे भक्त भावें मिळावे।
सदा बोलती बोल सारांश वाचा। जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥ ६ ॥

म्हणे दास सायास केल्यां घडेना। विकल्पें जनीं एक ठाईं पडेना।
घडे योग होतां विवेकी जनाचा। जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥ ७ ॥

## १०३. अनुदिनिं अनुतापें.

अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया।
परम दिनदयाळा नीरसीं मोहमाया ॥
अचपळ मन माझें नावरे आवरीतां।
तुजविण शिण होतो धांव रे धांव आतां ॥ १ ॥

भजनरहित रामा सर्वही जन्म गेला।
स्वजनजनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला ॥
रघुपति मति माझी आपुलीशी करावी।
सकळ त्यजुनि भावें कांस तूझी धरावी ॥ २ ॥

विषयजनित सूखें सूख होणार नाहीं।
तुजविण रघुनाथा ओखटें[3] सर्व कांहीं ॥

१ वस्त्रें. २ विश्रांतिस्थानें. ३ व्यर्थ.

रघुकुळटिळका रे हीत माझें करावें।
दुरित दुरि रहावें म्यां स्वरूपीं भरावें ॥ ३ ॥

तन मन धन माझें राघवा रूप तूझें।
तुजविण मज वाटे सर्व संसार ओझें ॥
प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी।
अचल भजनलीला लागली आस तूझी ॥ ४ ॥

चपळपण मनाचें मोडितां मोडवेना।
सकळ स्वजनमाया तोडितां तोडवेना ॥
घडिघडि विघडे हा निश्चयो अंतरींचा।
म्हणवुनि करुणा हे बोलतों दीन वाचा ॥ ५ ॥

जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटी ॥
तळमळ निववीं रे राम कारुण्यसिंधू।
षड्रिपुकुळ माझें तोडिं याचा समंधू ॥ ६ ॥

तुजविण करुणा हे कोण जाणेल माझी।
शिणत शिणत पोटीं पाहिली वाट तूझी ॥
झडकरि झड घालीं धांव पंचानना रे।
तुजविण मज नेते जंबुकी वासना रे ॥ ७ ॥

सबळ जनक माझा राम लावण्यपेटी।
म्हणवुनि मज पोटीं लागली आस मोठी ॥
दिवस गणित बोटीं प्राण ठेवोनि कंठीं।
अवचट मज भेटी होत घालीन मीठी ॥ ८ ॥

जननिजनकमाया लेंकरूं काय जाणें।
पय न लगत मखीं हाणितां वत्स नेणे ॥

जलधरकणआशा लागली चातकासी ।
हिमकर अवलोकी पक्षिया भूमिवासी ॥ ९ ॥
तुजविण मज तैसें जाहलें रामराया ।
विलग विषम काळीं सांडिती सर्व माया ॥
सकळजनसखा तूं स्वामि आणीक नाहीं ।
विषय वमन जैसें त्यागिलें सर्व कांहीं ॥ १० ॥
स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे ।
रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे ॥
जिवलग जिव घेती प्रेत सांडोनि देती ।
विषय सकळ नेती मागुता जन्म देती ॥ ११ ॥
सकळजन भवाचे आखिले वैभवाचे ।
जिवलग मज कैंचे चालतें हेंच साचें ॥
विलग विषमकाळीं सांडिती सर्व माळी ।
रघुवर सुखदाता सोडवी अंतकाळीं ॥ १२ ॥
सुख सुख म्हणतां तें दुःख ठाकोनि आलें ।
भजन सकळ गेलें चित्त दुश्चित्त झालें ॥
भ्रमुनि मन कळेना हीत तें आकळेना ।
परम कठिण देहीं देहबुद्धी गळेना ॥ १३ ॥
उपरति मज रामीं जाहली पूर्णकामीं ।
सकळभ्रमविरामीं[1] रामविश्रामधामीं ॥
घडि घडि मन आतां रामरूपीं भरावें ।
रघुकुळटिळका रे आपुलेसें करावें ॥ १४ ॥
जळचर जळवासी नेणती त्या जळासी ।
निशिदिनिं तुजपाशीं चूकलों गूणराशी ॥

१ जेथें सकळभ्रम विराम पावतात असा.

भुमिधरनिगमांसी वर्णवेना तयासी ।
सकळभुवनवासी भेटि दे रामदासीं ॥ १५ ॥

## १०४. तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों.

असंख्यात ते भक्त होऊनि गेले ।
तिहीं साधनांचे बहू कष्ट केले ॥
नव्हे कार्यकर्ता भुमीभार झालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों ॥ १ ॥
बहू दास ते तापसी तीर्थवासी ।
गिरीकंदरीं भेटि नाहीं जनासी ॥
स्थिती ऐकतां थोर विस्मीत झालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों ॥ २ ॥
सदा प्रेमळांसी तयां भेटलासी ।
तुझ्या दर्शनें स्पर्शनें पुण्यराशी ॥
अहंता मनीं शब्दज्ञानें बुडालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों ॥ ३ ॥
तुझ्या प्रीतिचे दास जन्मासि आले ।
असंख्यात ते कीर्ति बोलोनि गेले ॥
बहू धारणा थोर चकीत[१] झालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों ॥ ४ ॥
बहूसाल देवालयें हाटकाचीं[२] ।
रसाळा कळा लाघवें नाटकाचीं ॥
पुजा देखतां जाड जीवीं गळालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥ ५ ॥

---

१ आश्चर्यचकित. २ सोन्याची.

कितेकीं देह त्यागिले तूजलागीं ।
पुढें जाहले संगतीचे विभागी ॥
देहदुःख होतांचि वेगें पळालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥ ६ ॥

सदासर्वदा राम सोडोनि कामी ।
समर्था तुझे दास आह्मीं निकामी ॥
बहू स्वार्थबुद्धीन रे कष्टवीलों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥ ७

किती योगमूर्ती किती पुण्यमूर्ती ।
किती धर्मसंस्थापना अन्नशांति ॥
परस्तावलों कावलों तप्त झालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों ॥ ८ ॥

## १०६. रघूनायका, काय कैसें करावें

उदासीन हा काळ जातो गमेना ।
सदा सर्वदा थोर चिंता शमेना ॥
उठे मानसीं सर्व सोडोनि जावें ।
रघूनायका काय कैसें करावें ॥ १ ॥

जनीं बोलतां बोलतां वीट वाटे ।
नसे अंतरीं सूख कोठें न कंठे ॥
घडीनें घडी चित्त कीती धरावें ।
रघूनायका काय कैसें करावें ॥ २ ॥

बहू पाहतां अंतरीं कोंड होतो ।
शरीरास तो हेत सांडोनि जातो ॥

उपाधीस देखोनि वाटे सरावें ।
रघूनायका काय कैसें करावें ॥ ३ ॥

अवस्था मनीं होय नानापरींची ।
किती काय सांगूं गती अंतरींची ॥
विवेकेंचि या मानसा आवरावें ।
रघूनायका काय कैसें करावें ॥ ४ ॥

म्हणे दास ऊदास झालों दयाळा ।
जनीं व्यर्थ संसार हा वांयचाळा[1] ॥
तुझा मी तुला पूसतों प्रेमभावें ।
रघूनायका काय कैसें करावें ॥ ५ ॥

## १०६. रामाचा धांवा.

धांव रे रामराया किती अंत पाहासी ॥ ध्रु० ॥

प्राणांत मांडिलासे नये करुणा कैशी ।
पाहीन धणिभरी चरण झाडीन केशीं ।
नयन शिणले बा आतां केधवां येशी ॥ १ ॥

मीपण अहंकारें अंगीं भरला ताठा ।
विषयकर्दमांत लाज नाहीं लोळतां ।
चिळस उपजेना ऐसें जालें बा आतां ॥ २ ॥

मारुतिस्कंधभागीं शीघ्र बैसोनि यावें ।
राघवें वैद्यराजें कृपाऔषध द्यावें ।
दयेचे पद्महस्त माझे शिरीं ठेवावे ॥ ३ ॥

या भवीं रामदास थोर पावतो व्यथा ।

१ वायफळ खेळ.

कौतुक पाहतोसी काय जानकीकांता ।
दयाळा दीनबंधो भक्तवत्सला ताता ॥ ४ ॥

## १०७. बुद्धि दे रघुनायका.

युक्ति नाहीं बुद्धि नाहीं विद्या नाहीं विवंचितां ॥
नेणता भक्त मी तूझा बुद्धि दे रघुनायका ॥ १ ॥
मन हें आवरेना कीं वासना वावडे सदा ।
कल्पना धांवते सैरा बुद्धि दे रघुनायका ॥ २ ॥
अन्न नाहीं वस्त्र नाहीं सौख्य नाहीं जनांमधें ।
आश्रयो पाहतां नाहीं बुद्धि दे रघुनायका ॥ ३ ॥
बोलतां चालतां येना कार्यभाग कळेचिना ।
बहु मी पीडिलों लोकीं बुद्धि दे रघुनायका ॥ ४ ॥
तुझा मी टोणपा झालों कष्टलों बहुतांपरी ।
सौख्य तों पाहतां नाहीं बुद्धि दे रघुनायका ॥ ५ ॥
नेटकें लिहितां येना वाचितां चुकतां सदा ।
अर्थ तो सांगतां येना बुद्धि दे रघुनायका ॥ ६ ॥
प्रसंग वेळ तर्केना सुचेना दीर्घसूचना ।
मैत्रिकी राखितां येना बुद्धि दे रघुनायका ॥ ७ ॥
कळेना स्फूर्ति होईना आपदा लागली बहु ।
प्रत्यहीं पोट सोडीना बुद्धि दे रघुनायका ॥ ८ ॥
संसार नेटका नाहीं उद्वेगू वाटतो जिवीं ।
परमार्थू कळेना कीं बुद्धि दे रघुनायका ॥ ९ ॥
देईना पुर्विना कोणी उगेंचि जन हांसती ।
विसरू पडतो पोटीं बुद्धि दे रघुनायका ॥ १० ॥

पिशुनें वाटतो सर्वे कोणीही मजला नसे ।
समर्था ! तूं दयासिंधू बुद्धि दे रघुनायका ॥ ११ ॥
उदास वाटतें जीवीं आतां जावें कुणीकडे ।
तूं भक्तवत्सला रामा बुद्धि दे रघुनायका ॥ १२ ॥
कायावाचामनोभावें तुझा मी म्हणवीतसें ।
हे लाज तूजला माझी बुद्धि दे रघुनायका ॥ १३ ॥
सोडवील्या देवकोटी भूभार फेडिला बळें ।
भक्तांसि आश्रयो मोठा बुद्धि दे रघुनायका ॥ १४ ॥
उदंड भक्त तुम्हांला आम्हांला कोण पूसतें ।
ब्रीद हें राखणें आधीं बुद्धि दे रघुनायका ॥ १५ ॥
उदंड ऐकिली कीर्ति पतीतपावना प्रभो ।
मी एक रंक दुर्बुद्धि बुद्धि दे रघुनायका ॥ १६ ॥
आशा हे लागली मोठी दयाळू बा दया करी ।
आणीक नलगे कांहीं बुद्धि दे रघुनायका ॥ १७ ॥
रामदास म्हणे माझा संसार तुज लागला ।
संशय वाटतो पोटीं बुद्धि दे रघुनायका ॥ १८ ॥

१०८. रामदासांस कफव्यथा झाली असतां त्यांनीं केलेलें

मारुतीचें करुणाष्टक.

फणिवर उठवीला वेग अद्भूत केला ।
त्रिभुवनजनलोकीं कीर्तिचा घोष केला ॥
रघुपतिउपकारें दाटले थोर भारें ।
परम धिर उदारें रक्षिलें सौख्यकारें ॥ १ ॥
सबळ दळ मिळालें युद्ध ऊदंड झालें ।
कपिकटक निमालें पाहतां येश गेलें ॥

परदळ शरघातें कोटिच्या कोटि प्रेतें ।
अभिनव रणपातें दुःख बीभीषणातें ॥ २ ॥

कपिरिसघनदाटीं जाहली थोर दाटी ।
म्हणवुनी जगजेठी धांवणें चार कोटी ॥
मृत विर उठवीले मोकळे सिद्ध झाले ।
सकळ जन निवाले धन्य सामर्थ्य चाले ॥ ३ ॥

बहु प्रिय रघुनाथा मुख्य तूं प्राणदाता ।
उठवि मज अनाथा दूर सारूनि वेथा ॥
झडकरि भिमराया तूं करीं दृढ काया ।
रघुविरभजना या लागवेगीचि जाया ॥ ४ ॥

तुजविण मजलागीं पाहतां कोण आहे ।
म्हणवुनि मन माझें तूझि रे वास पाहे ॥
मज तुज निरवीलें पाहिजे आठवीलें ।
सकळिक निजदासांलागि सांभाळवीलें ॥ ५ ॥

उचित हित करावें उद्धरावें धरावें ।
अनुचित न करावें त्वां जनीं येश घ्यावें ॥
अघटित घडवावें सेवका सोडवावें ।
हरिभजन घडावें दुःख तें वीघडावें ॥ ६ ॥

प्रभुवर विरराया जाहली वज्रकाया ।
परदळ निवटाया दैत्यकुळें कुडाया[1] ॥
गिरिवर तुडवाया रम्य वेशें नटाया ।
तुजचि अलगडाया ठेविलें मुख्य ठाया ॥ ७ ॥

---

१ ठार मारण्यास.

बहुत सबळ सांठा मागतों अल्पवाटा ।
न करित हित कांटा थोर होईल ताठा ॥
कृपणपण नसावें भव्य लोकीं दिसावें ।
अनुदिन करुणेचें चिन्ह पोटीं वसावें ॥ ८ ॥
जलधर करुणेचा अंतरामाजी राहो ।
तरि तुज करुणा हे कां न ये सांग पाहों ॥
कठिण हृदय झालें काय कारुण्य केलें ।
न पवसि मज कां रे म्यां तुझें काय केलें ॥ ९ ॥
वडिलपण करावें सेवका सांवरावें ।
अनहित न करावें तूर्त हातीं धरावें ॥
निपटाचि हटवादें प्रार्थिला शब्दभेदें ।
कपि घन करुणेचा बोलला राम तेथें ॥ १० ॥
बहुताचि करुणा ही लोटली देवराया ।
सहजचि कफ गेलें जाहली दृढ काया ॥
परम सुख विलासे सर्वदा दासनूसे ।
पवनज तनुतोषें वंदिला सावकाशें ॥ ११ ॥

## १४. ऐतिहासिक.



### १०९. समर्थांचें स्वहस्तलिखित पत्र.

**श्रीरामसमर्थ.**

उत्तमगुणाळंकृत रघुनाथभक्तिपरायेण परोपकार राज्यमान्य राजेश्री रघुनाथभट गोसावी यांसी स्नेहपूर्वक सूचना. तुमचा निरोप घेउनु हेलवाकीहून स्वार जालों तें सुखरूप चाफलास पावलों. संकल्पाची समारादनाही झाली पुढें शरीराचा उपचार ही हळुहळु होतो. तुमचें मन मजवरि बहुत आहे तें तुमचे

आवडीच्या गुणें कल्याण होईल ऐसें नेमस्त[1] चिन्ह दिसतें. आपण ते कर्कष सीतलाईमधें बहुताचि श्रम पावलों, तो माझा सकळ श्रम घेउनु निरोप दिधला तो देव जाणे येविसीं चीत चमत्कारलें तें पत्रीं किती म्हणौनु लेहावें? माझें अरिष्ट तुह्मीं घेऊन मज उष्ण देशासी पाठविलें हा उपकार श्रीरघुनाथजीस जाला. मज रघुनाथजीवेगळें कोण्ही जिवलग नाहीं; आपण जाल समाचार रघुनाथजीस विदित केला या उपरी माझे ठांई तुम्हीं आहा. रघुनाथकृपेचा प्रत्यये तुम्हास आलियावरी प्रचितीसीं कलों येईल. बहुत काये लेहावें? वेदमूर्ती दिवाकरभट गोसांवी तेथें आलियावरी तुम्हीं माझा समाचार घेयासी ये प्रांतास आले पाहिजे. स्नेह बहुत असों दीजे हा पत्रार्थ. हें इतकें म्यां आवडीच्या कलवळयानें लिहिलें आहे मनें मन साक्ष असेल. परंतु तुम्हांस उपचारसा वाटोन रंजीस[2] होल तरी न होणें. जैसा दिवाकरभट तैसे तुम्हीं हा इत्यर्थ आहे बरें कललें पाहिजे. तुमचा आमचा येकांत प्रसंग जालियावरी मग ऐसें लिहितां न ये, म्हणौनि संधीमधें प्रसंग फावला पुढें फावेना म्हणौनि लांबेकरून[3] लिहिलें. वरकड इतर भाव मनामध्यें असेल तरी रघुनाथ साक्ष असे. तुम्हीं रजीस न होणें आणि जे आहे ते लिहिलें यांमधें मिथ्या स्तुती नाहीं. तुम्ही सर्वज्ञ आहा. तुमचें जें कांहीं आहे तें सकल माझेंचि आहे. म्या मज माझ्या मनास येईल तैसें लिहिलें येथें तुमचें काये गेलें? कांहीं चिंता न कीजे. तुम्हीं आमचेचि आहा, तुम्ही आम्ही सकल देवाचे आहों. शरीरभेदावरी न जाणे अंतरस्थिति पाहिल्याउपरी कलों येईल.

—सांप्रदायिक कागदपत्रें.

---

१ निश्चयपूर्वक. २ असंतोष. ३ विस्तारपूर्वक.

## ११०. रामदासांचें महंतास पत्र.

विवेक जालियां देवाचा योग। मग होणार नाहीं वियोग।
देव सर्वांचें अंतरंग। अखंडित भेटी॥

या समाधानें असावें। निरूपणीं विवरावें।
मानसपूजनें आठवावें। सकळ कांहीं॥
ऋणानबंधें भेटी होईल। परस्परें समाचार कळेल।
सहज वर्तमान निवळेल। ते प्रसंगीं॥

कांहीं समुंदाव[1] करणें। ये विषीं आलस्य न करणें।
आलस्य करितां उदंड उणें। दिसेल परमार्थीं॥
पोहोणारें बुडते तारावे। सामर्थ्यें बुडों नेदावे।
मूर्ख ते शाहाणे करावे। विवेकी पुरुषें॥
आपणाहुन जो धींग[2]। त्यासीं करूं नये प्रसंग।
आपणाधीन जो प्रसंग। तोचि करावा॥
सोईऱ्याधाईऱ्याचीं मुलें। तीक्षण बुधीचीं सखोलें।
तयासीं बोलणें मृद बोलें। करित जावें॥

त्याचा संसार समाचार। पुसत जावा विस्तार।
उदंड सांगतां तत्पर। होऊनि ऐकावें॥

दुःख ऐकतां दुःख जातें। त्याचें दुःख हळु होतें।
मग तें सर्वेचि धरितें। मित्रभावें॥
निकट मित्रि बरी होतां। मग त्यासी न्यावें येकांता।
म्हणावें रे भगवंता। कांहीं तऱ्हीं भजावें॥
पूर्वीं देव पूजिला नव्हता। म्हणोनि आली दरिद्रता।
या कारणें अनंता। कांहीं तऱ्ही भजावें॥

---

१ शिष्यसमुदाय. २ वरचढ.

मान्य होतां जप सांगावा । मग तो इकडे पाठवावा ।
मग तयाचा सकळ गोवा । उगऊं आम्हीं ॥

—विविधविषय १. १४१–१४२.

## १११. सुंदरमठ.

परंतु येकवचनी देव एक । जेणें सोडिले देव अनेक ।
सेवाहीन मी सेवक । त्याचा म्हणवी ॥

समर्थे अंगिकार केला । नाना संकटीं रक्षिला ।
त्याचिया अन्नें पिंड वाढविला । जन्मवरी ॥

मारुतीसारिखे सेवक । तेथें मी मानवी रंक ।
नवल सामर्थ्याचें कौतुक । काय सांगों ॥

समर्थ आणि दीननाथ । वैभवें समर्थाहून समर्थ ।
जेणें माझे मनोरथ । पूर्ण केले ॥

जें जें मनें अभिळासिलें । तें तें समर्थें पुरविलें ।
मज दीनास वाढविलें । मर्यादेवेगळें ॥

समर्थानें समर्थ करावें । तरीच समर्थ म्हणवावें ।
त्रैलोक्यास पडिलें ठावें । सामर्थ्य ज्याचें ॥

देवमात्र जोजावला । म्हणोनि कैपक्षी पावला ।
भुवनकंटक निर्दाळिला । दशमुख शत्रु ॥

जिहीं त्रैलोक्य जिंकिलें । त्यास मर्कटाहातीं मारविलें ।
भुवनत्रय आनंदविलें । दाशरथीनें ॥

बिभीषणास दिधली लंका । सुरवरांची फिटली शंका ।
समर्थें रामदास रंका । नवाजिलें ॥

---

१ संशय, संकट, विकल्प. २ त्रासला. ३ रक्षणकर्ता. ४ प्रसिद्ध केलं.

सुंदर मूर्ति सुंदर गुण । सुंदर कीर्ति सुंदर लक्षण ।
सुंदरमठीं देव आपण । वास केला ॥

सुंदर पाहोन वास केला । दास संनिध ठेविला ।
अवघा प्रांताचि पावन केला । कृपाळुपणें ॥

बावी पोखरणी झरे । टांकीं विशाळ सुंदरें ।
ठाईं ठाईं विशाळ मनोहरें । स्थळें निर्मिलीं ॥

कडे कपाटें दरे दर्कुटें । पाहों जातां भयचि वाटे ।
ऐसे स्थळीं वैभव दाटे । देणें रघुनाथाचें ॥

अंतर्निष्ठ अखंडध्यानी । संनिध रामवैरदायनी ।
विश्वमाता त्रैलोक्यजननी । मूळमाया ॥

—विविधविषय २. १३७–१३८.

### ११२. प्रतापगडच्या भवानीचें स्तोत्र.

प्रपंचीं आमचे कुळीं । तुळजा कुळदेवता ।
नेणतां ऐकिलें होतें । जाणतां स्मरलें मनीं ॥

श्रेष्ठांची कामना होती । पुर्विली मनकामना ।
नौसं जो नोसिला होता । तो त्यापासुनि चुकला ॥

पुत्रची घेतला त्यांचा । जोगी करुनि सोडिला ।
ख्यानीति दाविली मोठी । न्याय नीति चुकेचिना ॥

वैराग्य घेतलें पोटीं । सर्व संसार सांडिला ।
तुझिया दर्शना आलों । कृपादृष्टी नवाजिलों ॥

तुझा नवाजिला आहे । महंत म्हणती जनीं ।
तुझेंची सर्वही देणें । सर्वही तुजपासुनी ॥

---

१ प्रतापगडची भवानी. २ नवस. ३ ख्याती ४ प्रसिद्ध झालों.

संसारीं मोकळें केलें । आनंदीं ठाव दिधला ।
तोडिली सर्वही चिंता । तूं माया सत्य जाहालें ॥
पुर्विल काय मी सांगों । ईच्छा पूर्ण परोपरीं ।
मागील आठवेनासें । केलें आश्चीर्य वाटलें ॥
सदानंदीं उदो[1] जाला । सुख संतोष फावला ।
पराधेनता गेली । सत्ता उदंड चालिली ॥
उदंड ऐकिलें होतें । रामासी वरु दीधला ।
मी दास रघुनाथाचा । मजही वरदायेनी ॥
श्रेष्ठांचा नौस जो होता । तो मी फेडीनसें म्हणं ।
पुष्प देउनि उतराई । ऐसें हें कल्पिलें मनीं ॥
तुळजापुर ठाकेना । चालिली पश्चिमेकडे ।
पारघाटीं जगन्माता । सद्य[2] येउनी राहिली ॥
ऐसें हें ऐकिलें होतें । हेत तेथेंचि पावला ।
पुष्पाची कल्पना होती । तेथें पुष्पचि दिधलें ॥
ऐसी तूं दयाळु माता । हेमपुष्पाचि घेतलें ।
संतुष्ट भक्तिभावानें । त्रैलोक्यजननी पाहा ॥
थोड्यानें श्लाघ्यता केली । थोर संतोष पावलों ।
उत्तीर्ण काये म्यां व्हावें । तुझे कृपेसी रोकडें ॥
तुझेंची तुजला दिल्हें । म्यां हें कोठुनि आणिलें ।
संकटें वारिलीं नाना । रक्षिलें बहुतांपरीं ॥
जीवींचें जाणते माता । तूं माता मज रोकडी ।
लोकांच्या चुकती माता । आचुक जननी मला ॥

१ उदय. २ हल्लीं.

येकची मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।
तुझा तूं वाढवी राजा । सीघ्र आम्हांची देखतां ।
दुष्ट संव्हारिले मागें । ऐसें उदंड ऐकतों ।
परंतु रोकडें कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवी ॥
देवाचीं राहिलीं सत्त्वें । तूं सत्त्व पाहासी किती ।
भक्तांसी वाढवीं वेगीं । ईच्छा पूर्ण परोपरीं ॥
रामदास म्हणे माझें । सर्व आतुर बोलणें ।
क्षमावें तुळजे मातें । इच्छा पूर्णची तें करो ॥

—रामदासांची कविता २९३. १–२०.

११३. शिवाजीचें वर्णन.

निश्चयाचा महामेरु । बहुत जनांसी आधारु ।
अखंडस्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ॥ १ ॥
परोपकाराचिया राशी । उदंड घडती जयासी ।
तयाचे गुणमहत्त्वासी । तुळणा कैंची ॥ २ ॥
नरपति हयपति गजपति । गडपति भूपति जळपति ।
पुरंदर आणि छत्रपति । शक्ति पृष्ठभागीं ॥ ३ ॥
यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।
पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ॥ ४ ॥
आचारशीळ विचारशीळ । दानशीळ धर्मशीळ ।
सर्वज्ञपणें सुशीळ । सकळां ठाईं ॥ ५ ॥
धीर उदार गंभीर । शूर क्रियेसी तत्पर ।
सावधपणें नृपवर । तुच्छ केले ॥ ६ ॥

तीर्थक्षेत्रें मोडिलीं। ब्राह्मणस्थानें भ्रष्ट जालीं।
सकळ पृथ्वी आंदोळली। धर्म गेला ॥ ७ ॥

देवधर्मगोब्राह्मण। यांचें करावया संरक्षण।
हृदयस्थ जाला नारायण। प्रेरणा केली ॥ ८ ॥

उदंड पंडित पुराणिक। कवीश्वर याज्ञिक वैदिक।
धूर्त तार्किक सभानायक। तुमचे ठायीं ॥ ९ ॥

या भूमंडळाचे ठायीं। धर्म रक्षी ऐसा नाहीं।
महाराष्ट्र धर्म राहिला कांहीं। तुम्हांकारितां ॥ १० ॥

आणिकही धर्मकृत्यें चालती। आश्रित होऊनी कित्येक राहती।
धन्य धन्य तुमची कीर्ति। विश्वीं विस्तारली ॥ ११ ॥

कित्येक दुष्ट संहारिले। कित्येकांस धाक सूटले।
कित्येकांस आश्रय जाले। शिव कल्याणराजा ॥ १२ ॥

तुमचे देशीं वास्तव्य केलें। परंतु वर्तमान नाहीं घेतलें।
ऋणानुबंधें विस्मरण जालें। काय नेणूं ॥ १३ ॥

सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ती। सांगणें काय तुम्हांप्रती।
धर्मस्थापनेची कीर्ती। सांभाळली पाहिजे ॥ १४ ॥

उदंड राजकारण तटलें। तेणें चित्त विभागलें।
प्रसंग नसतां लिहिलें। क्षमा केली पाहिजे ॥ १५ ॥

## ११४. क्षात्रधर्म.

अल्पस्वल्प संसारधर्म। मागां बोलिलों राजधर्म।
आतां ऐका क्षात्रधर्म। परम दुर्लभ जो ॥ १ ॥

जयास जिवाचें वाटे भय। त्यानें क्षात्रधर्म करूं नये।
कांहीं तरी करूनि उपाये। पोट भरावें ॥ २ ॥

विन्मुख मरणीं नर्क होती । वांचून येतां मोठी फजिती ।
इहलोक परलोक जाती । पहाना कां ॥ ३ ॥
मारितां मारितां मरावें । तेणें गतीस पावावें ।
फिरोन येतां भोगावें । महद्भाग्य ॥ ४ ॥
नजर करारी राखणें । कार्य पाहुनि खतल करणें ।
तेणें रणशूराचीं अंतःकरणें । चाकित होती ॥ ५ ॥
जैसा भांड्याचा[1] गलोला[2] । निर्भय भारामधें[3] पडिला ।
तैसा क्षत्री रिचवला । परसैन्यांमध्यें ॥ ६ ॥
निःशंकपणें भार फुटती । परवीरांचे तवके तुटती ।
जैसा बाळिया घालुनि घेती । भैरी उठतां ॥ ७ ॥
ऐसे अवघेच उठतां । परदळाची कोण चिंता ।
हरणें लोळवी चित्ता । देखत जैसा ॥ ८ ॥
मर्दें तकवा सोडूं नये । म्हणजे प्राप्त होतो जय ।
कार्य प्रसंग समय । ओळखावा ॥ ९ ॥
कार्य समजेना अंतरें । तें काय झुंजेल विचारें ।
युद्ध करावें खबरदारें । लोक राजी राखतां ॥ १० ॥
दोन्ही दळें एकवटें । मिसळताती लखलखाटें ।
युद्ध करावें खणखणाटें । सीमा सांडुनी ॥ ११ ॥
देव मात्र उच्छेदिला । जित्यापरीस मृत्यु भला ।
आपुला स्वधर्म बुडविला । ऐसें समजावें॥ १२ ॥
मराठा तितका मेळवावा । आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा ।
ये विषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥ १३ ॥

---

१ तोफ. २ गोळा. ३ सैन्य.

मरणहाक तो चुकेना । देह वांचवितां वाचेना ।
विवेकी होऊन समजाना । काय करावें ॥ १४ ॥

भले कुळवंत म्हणावें । तेंही वेगीं हजीर व्हावें ।
हजीर न होतां कष्टावें । लागेल पुढें ॥ १५ ॥

एक जाती दोन जाती पावला । तो कैसा म्हणावा भला ।
तुम्हां सकळांस कोप आला । तरी क्षमा केली पाहिजे ॥ १६ ॥

देवद्रोही तितुके कुत्ते । मारूनि घालावे परते ।
देवदास पावती फत्ते । यदर्थीं संशय नाहीं ॥ १७ ॥

देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा ।
मुलुखबडवा कां बुडवावा । धर्मसंस्थापनेसाठीं ॥ १८ ॥

विवेक विचार सावधपणें । दीर्घ प्रयत्न केलाचि करणें ।
तुळजावराचेनि गुणें । रामें रावण मारिला ॥ १९ ॥

अहो हे तुळजा भवानी । प्रसिद्ध रामवरदायिनी ।
रामदास ध्यातो मनीं । यन्निमित्त ॥ २० ॥

## ११६. शिवाजीची सनद.

श्री.

श्रीरघुपती.　　　　श्रीमारुती.

आश्विन शु॥ १० शके १६००.

श्रीसद्गुरुवर्य श्रीसकळतीर्थरूप श्रीकैवल्यधाम,

श्रीमहाराज स्वामीचे सेवेसीं.

चरणरज शिवाजी राजे यांनीं चरणावरी मस्तक ठेऊन विज्ञापना। जे मजवर कृपा करुनु सनाथ केले. आज्ञा केली कीं तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करून धर्मस्थापना, देव-ब्राह्मणाची सेवा, प्रजेची पीडा दूर करुनु, पाळण, रक्षण करावें; हें व्रत संपादून

त्यांत परमार्थ करावा. तुम्हीं जें मनीं धराल तें श्री सिद्धीस पाववील त्याजवरून जो जो उद्योग केला व दुष्ट तुरुक (पा भे दुराढे)लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्यें करुनु राज्यपरंपरा अक्षई चालेल ऐशीं स्थळें दुर्घट करावीं ऐसें जें जें मनीं धरिलें तें तें स्वामींनीं आशीर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केले

याउपरि राज्य सर्व संपादिलें तें चरणीं अर्पण करुनु सर्वकाळ सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला तेव्हां आज्ञा जाहली कीं, "तुम्हांस पूर्वी धर्म सांगितले तेच करावेस तीच सेवा होय" ऐसें आज्ञापिलें.

यावरून निकटवास घडुनु वारंवार दर्शन घडावें; श्रीची स्थापना कोठें तरी होउनु सांप्रदाय शिष्य व भक्ती दिगंत विस्तीर्ण घडावी ऐसी प्रार्थना केली तेही आसमंतात् गिरिगव्हरीं वास करुनु चाफळीं श्रीची स्थापना करुनु सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली.

त्यास चाफळीं श्रीची पूजा मोहोत्छाव ब्राह्मणभोजन, अतिथि, इमारत सर्व यथासांग घडावें. जेथें जेथें श्रीची मूर्तिस्थापना जाहाली तेथें उत्छाव पूजा घडावी यास राज्य संपादिलें यांतील ग्रामभूमी कोठें काय नेमावें ते आज्ञा व्हावी तेव्हां आज्ञा जाहली कीं "विशेष उपाधीचें कारण काय" तथापि तुमचे मनीं श्रीची सेवा घडावी हा निश्चय जाहला त्यास यथाअवकाश जेथें जें नेमावेंसें वाटेल तें नेमावें, व पुढें जसा सांप्रदायाचा व राज्याचा व वंशाचा विस्तार होईल तैसें करीत जावें." याप्रकारें आज्ञा जाहली.

यावरुनु देशांतरीं सांप्रदाय व श्रीच्या स्थापना जाहल्या त्यास ग्रामभूमीचीं पत्रें करून पाठविलीं. श्रीसंनिध चाफळीं एकशें एकवीस गांव सर्वमान्य व एकशें एकवीस गांवीं अकरा बिघे प्रमाणें भूमी व अकरा स्थळीं श्रीची स्थापना झाली. तेथें नैवेद्यपूजेस भूमि अकरा बिघे प्रमाणें नेमिले आहेती ऐसा संकल्प केला आहे. तो सिद्धीस नेहण्याविषयीं विनंति केली तेव्हां संकल्प केला तो परंपरेनें सेवटास न्याहावा ऐसी आज्ञा जाहली त्याजवरून सांप्रत गाऊ व भूमी नेमिले तपशील—

१ मौजे चाफळ, मौजे नाणेगांव......वगैरे गांवें ३३.

२ मौजे दहीफळ बुद्रुक, परगणे हवळी, श्रीश्रष्ठाचे समाधीकडे देह २

३ गांव गंना जमीन बिघे चारशें एकोणीस.

धान्य गल्ला हरजिनसी खंडी १२१ एकशें एकवीस. येकूण दरोबस्त सर्वमान्य गांऊ तेहेतीस व जमीन बिघे गाऊगना चारशें येकोणीस व कुरण एक श्रीचे पूजा उछाहाबद्दल संकल्पांतील सांप्रत नेमिले व उछाहाचे दिवसास व इमारतीस नक्ती ऐवज व धान्य समयाचे समयास प्रविष्ट करीन येणें करोन अक्षई उछाहादि चालविण्याविषीं आज्ञा असावी

राज्याभिषेक ५ कालयुक्ताक्षि नाम संवत्सरे अश्विन शुद्ध १० दशमी बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

## ११६. आनंदवनभुवन.

जन्मदुःखें जरादुःखें। नित्य दुःखें पुनः पुन्हा।
संसार त्यागणें जाणें। आनंदवनभुवना॥

कष्टलों कष्टलों देवा। पुरे संसार जाहला।
देहत्यागासि येणें हो। आनंदवनभुवना॥

स्वधर्मा आड जें विघ्नें । तें तें सर्वत्र उठिलीं ।
लाटिलीं कुटिलीं देवें । दापिलीं कापिलीं बहु ॥
खोळले[1] लोक देवाचे । मुख्य देवचि उठिला ।
कळेना कायरे होतें । आनंदवनभुवनीं ॥
देवदेव बहु देव । नाना देव परोपरी ।
दाटणी जाहली मोठी । आनंदवनभुवनीं ॥
कल्पांत मांडला मोठा । म्लेंच्छ दैत्य बुडावया ।
कैपक्ष घेतला देवीं । आनंदवनभुवनीं ॥
बुडाले सर्वही पापी । हिंदुस्तान बळावलें ।
अभक्तांचा क्षयो झाला । आनंदवनभुवनीं ॥
पूर्वीं जे मारिले होते । तेचि आतां बळावले ।
कोपला देव देवांचा । आनंदवनभुवनीं ॥
येथून वाढिला धर्मु । रमाधर्म समागमें ।
संतोष मांडला मोठा । आनंदवनभुवनीं ॥
बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छ संहार जाहला ।
मोडिलीं मांडिलीं क्षेत्रें । आनंदवनभुवनीं ॥
उदंड जाहले पाणी । स्नानसंध्या करावया ।
जपतप अनुष्ठानें । आनंदवनभुवनीं ॥
लिहिला प्रत्ययो आला । मोठा आनंद जाहला ।
चढता वाढता प्रेमा । आनंदवनभुवनीं ॥
बंड पाखंड उडालें । शुद्ध अध्यात्म वाढलें ।
चढता वाढता प्रेमा । आनंदवनभुवनीं ॥

---

१ खवळले.

रामवरदायिनी माता । गर्द घेऊनि उठली ।
मर्दिले पूर्वींचे पापी । आनंदवनभुवनीं ॥

प्रत्यक्ष चालली राया । मूळमाया समागमें ।
नष्ट चांडाळ ते खाया । आनंदवनभुवनीं ॥

भक्तांसि रक्षिले मागें । आतांही रक्षिते पहा ।
भक्तांसि दिधलें सर्वैं । आनंदवनभुवनीं ॥

देवभक्त येक जाले । मिळाले जीव सर्वही ।
संतोष पावले तेथें । आनंदवनभुवनीं ॥

मनासी प्रचीत आली । शब्दीं विश्वास वाटला ।
कामना पुरती सर्वैं । आनंदवनभुवनीं ॥

—रामदासांची कविता ४२१. १—९३.

## १५ सांप्रदायिक.



### ११७. रामदासांचे गुरु कोण ?

आदिनारायण सद्गुरु आमुचा । शिष्य झाला त्याचा महाविष्णु ॥१॥
तयाचा जो शिष्य तो जाणावा हंस । तेणें ब्रह्मयास उपदेशिलें ॥२॥
ब्रह्मदेवें केला उपदेश वसिष्ठा । तेथें धरा निष्ठा शुद्धभावो ॥ ३ ॥
वसिष्ठ उपदेशी श्रीरामरायासी । रामें रामदासीं उपदेशिलें ॥ ४ ॥
उपदेश देवोनि दिधला मारुती । स्वयें रघुपती निरवीता ॥ १ ॥
निरवितां तेणें झालों रामदास । संसारीं उदास म्हणोनियां ॥ २ ॥
म्हणोनि आमुचे कुळीं कुळदैवत । राम हनुमंत आत्मरूपी ॥ ३ ॥
आत्मरूपी झाला रामीरामदास । केला उपदेश दीनोद्धारा ॥ ४ ॥

## ११८. रामदासांचें स्वचरित्रकथन.

नमो अधिष्ठाता विष्णु मुख्य साधु ।
तेथूनियां बोधु विधीलागीं ॥ १ ॥

विधीपासुनियां ज्ञान विधिसुता ।
तेंचि ज्ञान प्राप्त वसिष्ठासी ॥ २ ॥

वसिष्ठें उपदेश केला रामचंद्रा ।
तोचि महारुद्रा हनुमंता ॥ ३ ॥

हनुमंत कलीमाजि चिरंजीव ।
झाले देव सर्व बौद्धरूप ॥ ४ ॥

बौद्ध नारायण होऊनी बैसला ।
उपाव बोलिला व्यासमुनि ॥ ५ ॥

व्यासमुनि बोले भविष्यपुराण ।
जग उद्धरणें कलीमाजी ॥ ६ ॥

कलीमाजी गोदातीरीं पुण्य क्षेत्र ।
तेथें वातपुत्र अवतरे ॥ ७ ॥

अवतरे अभिधानी रामदास ।
कृष्णातीरीं वास जगदुद्धारा ॥ ८ ॥

जगदुद्धारासाठीं श्रीरामा सांकडें ।
केलें वाडेंकोडें भक्तिपंथें ॥ ९ ॥

भक्तिपंथें मोठा केला श्रीरामानें ।
जंबू अभिधानें ग्राम तेथें ॥ १० ॥

तेथें ब्रह्मनिष्ठ अधिष्ठाता पूर्ण ।
सूर्य नामा जाण द्विजवर्य ॥ ११ ॥

द्विजवर्य सूर्य जैसा तपोधन ।
अद्भुत विंदान झालें तेथें ॥ १२ ॥

झाली रामनवमी मध्य अष्टमीसी ।
अर्धरात्रीं त्यासी दूत आले ॥ १३ ॥

दूत आले पुढें घालोनि चालिले ।
महाद्वारा आले भीम जेथें ॥ १४ ॥

भीमदेवालयीं नेऊनी तयासी ।
तेथें उभयतांसी देखियेलें ॥ १५ ॥

देखियेलें राजपुत्र सूर्यवंशी ।
झांपड नेत्रांसी पडे तेव्हां ॥ १६ ॥

पडे तेव्हां जसा दंडवत भूमी ।
मग अंतर्यामीं बोलाविलें ॥ १७ ॥

बोलवूनि माथां ठेवी सव्य पाणी ।
मंत्र सांगे कर्णी रामनाम ॥ १८ ॥

नाम सांगुनियां ताम्रमूर्ति रम्य ।
पट्टाभिश्रीराम दिधला तया ॥ १९ ॥

तया दिला वर तुज पुत्र होतील ।
ध्वज उभारतील रामदास्यें ॥ २० ॥

रामदास्य झालें धन्य वंशोद्धार ।
बोलोनि सत्वर गेत्र झाले ॥ २१ ॥

झाला रामनवमी महोत्सव थोर ।
मध्यान्हीं सत्वर जन्म झाला ॥ २२ ॥

---

१ लीला, करणी. २ मारुति.

जन्म झाला झाला देव वंशा आले ।
उपासना चाले राघवाची ॥ २३ ॥

राघवाची भक्ति सुखाची विश्रांति ।
पितयाची शांति झाली पुढें ॥ २४ ॥

पुढें ज्येष्ठबंधु न सांगेचि कांहीं ।
सुखें देवालयीं निद्रा केली ॥ २५ ॥

निद्रा केली तेथें श्रीरामें उठवूनी ।
तोचि मंत्र कानीं सांगितला ॥ २६ ॥

सांगितला बोध रामीरामदासा ।
गुरूच्याहि वंशा निरोपिलें ॥ २७ ॥

## ११९. हनुमंत आमुची कुळवल्ली.

हनुमंत आमची कुळवल्ली । राममंडपीं वेला गेली ।
श्रीरामभक्तीनें फळली । रामदास बोले ॥ १॥

आमुचे कुळीं हनुमंत । हनुमंत आमुचें दैवत ।
तयावीण आमुचा परमार्थ । सिद्धीतें न पवे कीं ॥ २ ॥

साह्य आह्मांसी हनुमंत । आराध्य दैवत श्रीरघुनाथ ।
गुरु श्रीराम समर्थ । उणें काय दासासीं ॥ ३ ॥

दाता एक रघुनंदन । वरकड लंडी देईल कोण ।
हे सोडोन आम्हीं जन । कोणाप्रति मागावें ॥ ४ ॥

ह्मणोनि आम्हीं रामदास । रामचरणीं आमुचा विश्वास ।
कोसळोनि पडो रे आकाश । आणिकाची वास[1] न पाहूं ॥५॥

स्वरूपसांप्रदाय अयोध्यामठ । जानकी देवी रघुनाथ दैवत ।
मारुती उपासक नेमस्त । वाढविला परमार्थ रामदासीं ॥ ६ ॥

---

१ वाट.

## १२०. "भीमरूपी" स्तोत्र.

भीमरूपी महारुद्रा । वज्रहनुमान मारुती ।
वनारी अंजनीसूता । रामदूता प्रभंजना ॥ १ ॥

महाबळी प्राणदाता । सकळां उठवी बळें ।
सौख्यकारी शोकहारी । धूर्त वैष्णव गायका ॥ २ ॥

दीननाथा हरीरूपा । सुंदरा जगदांतरा ।
पातालदेवताहंता । भव्य सिंदुरलेपना ॥ ३ ॥

लोकनाथा जगन्नाथा । प्राणनाथा पुरातना ।
पुण्यवंता पुण्यशीला । पावना परितोषका ॥ ४ ॥

ध्वजांगें उचली बाहो । आवेशें लोटला पुढें ।
कालाग्नी कालरुद्राग्नी । देखतां कांपती भयें ॥ ५ ॥

ब्रह्मांड माइल नेणों । आवळे दंतपंगती ।
नेत्राग्नी चालिल्या ज्वाळा । भ्रुकुटी ताठिल्या बळें ॥ ६ ॥

पुच्छ तें मुर्डिलें माथां । किरीटीं कुंडलें बरीं ।
सुवर्ण कटि कांसोटी । घंटा किंकिणी नागरा[१] ॥ ७ ॥

ठकारें पर्वता ऐसा । नेटका सडपातळू ।
चपळांग पाहतां मोठें । महाविद्युल्लतेपरी ॥ ८ ॥

कोटिच्या कोटि उड्डाणें । झेंपावे उत्तरेकडे ।
मंद्राद्रीसारिखा द्रोणू । क्रोधें उत्पाटिला बळें ॥ ९ ॥

आणिला मागुती नेला । आला गेला मनोगती ।
मनासी टाकिलें मागें । गतीसी तुळणा नसे ॥ १० ॥

---

१ सुंदर.

अणूपासूनि ब्रह्मांडा । एवढा होत जातसे ।
ब्रह्मांडाभोंवतें वेढे । वज्रपुच्छें करूं सके ॥ ११ ॥

तयासी तूळणा कोठें । मेरु मंदार धाकुटे ।
तयासी तूळणा कैंची । ब्रह्मांडीं पाहतां नसे ॥ १२ ॥

आरक्त देखिलें डोळां । गिळिलें सूर्यमंडळा ।
वाढतां वाढतां वाढे । भेदिलें शून्यमंडळा[1] ॥ १३ ॥

भूतप्रेतसमंधादि । रोगव्याधि समस्तही ।
नासती तुटती चिंता । आनंदे भीमदर्शनें ॥ १४ ॥

हे धरा पंधरा श्लोकी । लाभली शोभली भली ।
दृढ देहो निसंदेहो । संख्या चंद्रकळा[2] गुणें ॥ १५ ॥

रामदासीं अग्रगण्यू । कपिकूळासि मंडणू ।
रामरूप अंतरात्मा । दर्शनें दोष नासती ॥ १६ ॥

## १२१. छत्रसिंहासनीं.

छत्रसिंहासनीं अयोध्येचा राजा । नांदतसे माझा मायबाप ॥ १ ॥
माझा मायबाप त्रिलोकीं समर्थ । सर्व मनोरथ पूर्ण करी ॥ २ ॥
पूर्ण प्रतापाचा कैवारी देवांचा । नाथ अनाथांचा स्वामी माझा ॥३॥
स्वामी माझा राम योगियां विश्राम । सांपडलें वर्म थोर भाग्यें ॥४॥
थोर भाग्य ज्याचें राम त्याचे कुळीं । संकटीं सांभाळी भावबळें ॥५॥
भावबळें जिहीं धरिला अंतरीं । तया क्षणभरी विसंभेना ॥ ६ ॥
विसंभेना कदा आपुल्या दासासी । रामीरामदासीं कुळस्वामी ॥७॥

## १२२. रामाचें दर्शन कव्हां होईल ?

आज्ञेप्रमाणें परमार्थ । केला जाण म्यां यथार्थ ॥ १ ॥
आतां देहाचा कंटाळा । आला असे जी दयाळा ॥ २ ॥

---

१ आकाश २ सोळा.

आतां एकचि मागणें । कृपा करूनियां देणें ॥ ३ ॥
ज्याची दर्शनाची आशा । त्याची पुरवावी इच्छा ॥ ४ ॥
ऐक सखया वचन । त्यासी देईन दर्शन ॥ ५ ॥
तेरा अक्षरी मंत्राचा । जप करील जो साचा ॥ ६ ॥
गणना होतां तेरा कोटी । त्यासी भेटेन जगजेठी ॥ ७ ॥
भय न धरावें मनीं । बहु बोलिलों म्हणुनी ॥ ८ ॥
नलगे आसनीं बसावें । नलगे अन्नही त्यागावें ॥ ९ ॥
येतां जातां धंदा करितां । जपसंख्या मात्र होतां ॥ १० ॥
तेरा कोटी गणना तेची । पापें निरसतीं जन्मांतरींचीं ॥ ११ ॥
त्यासी देईन दर्शनें । तात्काळचि मुक्त होणें ॥ १२ ॥
ऐसा वर होतां जाण । दास झाला सुखसंपन्न ॥ १३ ॥

## १६. अभंग, पदें, वगैरे.



### १२३. " राघवाची कास न सोडी सत्य. "

जठरीं लागो क्षुधा होत नाना आपदा ।
भक्तिप्रेम कदा न संडी सत्य ॥ १ ॥
शब्द न फुटे तरी चिंतीन अंतरीं ।
भक्तिप्रेम परी न संडी सत्य ॥ २ ॥
नानापरी आघात चिरकाल होत ।
भक्तिप्रेमामृत न संडी सत्य ॥ ३ ॥
दाहूं वडवानळ अथवा दंशू काळ ।
भक्तिप्रेमबळ न संडी सत्य ॥ ४ ॥
आतांच हा देह राहो अथवा जावो ।
भक्तिप्रेमभावो न संडी सत्य ॥ ५ ॥

म्हणे रामीरामदास वरीं पडो आकाश ।
राघवाची कास न सोडी सत्य ॥ ६ ॥

## १२४. आतां तरी जाय जाय.

आतां तरि जाय जाय जाय । धरि सद्गुरुचे पाय ॥ ध्रु० ॥
संकल्प विकल्प सोडुनि राहे । दृढ धरुनी पाय पाय पाय ॥ १ ॥
नामस्मरण ज्या मुखिं नाहीं । त्यानें वांचुनि काय काय काय ॥२॥
मानवतनु ही न ये मागुती । बरें विचारुनि पाहें पाहें पाहें ॥ ३ ॥
आत्मानात्मविचार न करितां । व्यर्थ प्रसवली माय माय माय ॥४॥
सहस्र अन्याय जरी त्वां केले । क्षमा करिल गुरु माय माय माय॥५॥
रामदास म्हणे नामस्मरणें । भिक्षा मागुनि खाय खाय खाय ॥६॥

## १२५. देव जवळ असून भेट नाहीं.

देव जवळीं अंतरीं । भेटी नाहीं जन्मवरी ॥ १ ॥
मूर्ति त्रैलोक्यीं संचली । दृष्टि विश्वाची चुकली ॥ २ ॥
भाग्यें आले संतजन । झालें देवाचें दर्शन ॥ ३ ॥
रामदासीं योग झाला । देहीं देव प्रगटला ॥ ४ ॥

## १२६. एकही क्षण वायां न दवडितां देवाचें चिंतन.

शिंक जांभई खोकला । तितुका काळ व्यर्थ गेला ॥ १ ॥
आतां ऐसें न करावें । नाम जीवीं तें धरावें ॥ २ ॥
श्वास उश्वास निघतो । तितुका काळ व्यर्थ जातो ॥ ३ ॥
पात्या पातें न लगत । तितुकें वय व्यर्थ जात ॥ ४ ॥
लागे अवचित उचकी । तितुकें वय काळ लेखी ॥ ५ ॥
म्हणे रामीरामदास । होतो आयुष्याचा नाश ॥ ६ ॥

### १२७. देवाचा वियोग नाहीं तो योग.

योगियांचा देव मज सांपडला । थोर लाभ जाला येकायेकीं ॥ १ ॥
येकायेकीं येक त्रैलोक्यनायेक । देखिला सन्मुख चहूंकडे ॥ २ ॥
चहूंकडे देव नित्य निरंतर । व्यापूनी अंतर समागमें ॥ ३ ॥
समागम मज रामाचा जोडला । वियोग हा केला देशधडी ॥ ४ ॥
देशधडी केला विवेकें वियोग । रामदासीं योग सर्व काळ ॥ ५ ॥

### १२८. देव एकाएकीं प्रसन्न होतो.

आलभ्याचा लाभ आकस्मात जाला । देव हा वोळला येकायेकीं ॥१॥
येकायेकीं सुख जाहालें येकट । वेर्थ खटपट साधनाची ॥ २ ॥
साधनाची चिंता तुटली पाहातां । वस्तुरूप होतां वेळ नाहीं ॥ ३ ॥
वेळ नाहीं मज देवदरुशणा । सन्मुखाचि जाणा चहूंकडे ॥ ४ ॥
चहूंकडे मज देवाचें स्वरूप । तेथें माझें रूप हारपलें ॥ ५ ॥
हारपलें चित्त देवासी चिंतीतां । दास म्हणे आतां कोठें आहे ॥ ६ ॥

### १२९. देवाचें सर्वत्र दर्शन.

संताचेनि संगें देव पाठीं लागे । सांडूं जातां मागें सांडवेना ॥ १ ॥
सांडवेना देव सदा समागमीं । बाह्यअंतर्यामीं सारिखाची ॥ २ ॥
सारिखाची कडां कपाटीं सीखरीं । गृहीं वनांतरीं सारिखाची ॥३॥
सारिखाची तीर्थीं सारिखाची क्षत्रीं[1] । दिवा आणि रात्रीं सारिखाची॥४॥
सारिखाची अंत नाहीं तो अनंत । रामदासीं कींत[2] मावळला ॥ ५ ॥

### १३०. राघवाच्या भेटीनें अमृतत्व.

बहु काळ गेले देवासी धुंडीतां । देव पाहों जातां जवळीच ॥ १ ॥
जवळींच असे पाहातां न दिसे । संन्नीधनी वसे रात्रंदिस ॥ २ ॥
रात्रदिस देव बाह्यअभ्यांतरीं । जीवा क्षणभरी विसंभेना ॥ ३ ॥
विसंभेना परी जीव हे नेणती । जातां अधोगती म्हणोनियां ॥ ४ ॥

१ क्षेत्र. २ किंतु, शंका.

म्हणोनीयां सदा सावध असावें। विमुख नसावें राघवेंसीं ॥ ५ ॥
राम पूर्वपुण्यें जालीया सन्मुख । मग तो विमुख होऊं नेणें ॥ ६ ॥
होऊं नेणे राम सर्वांगें सुंदर । नित्य निरंतर मागें पुढें ॥ ७ ॥
मागें पुढें सन्मुखची चहुंकडे । भेटी हे निवाडें राघवाची ॥ ८ ॥
राघवाची भेटी जाल्यां नाहीं तुटी । मग कल्पकोटी चिरंजीव ॥ ९ ॥
चिरंजीव होये राघवीं मिळतां । तेथें पाहों जातां मृत्य नाहीं ॥१०॥
नाहीं जन्म मृत्य नाहीं येणें जाणें। स्वरूपीं राहाणें सर्वकाळ ॥११॥
सर्वकाळ मन तदाकार होय । जरी राहे सोये श्रवणाची ॥ १२ ॥
श्रवणाची सोये संतांचेनि संगें । विचारें विभागे अहंभाव ॥ १३ ॥
अहंभावें राम भेटला न जाये । जवळींच होये दुरी कैसा ॥ १४ ॥
दुरी कैसा होये अहंभावें करी । जवळीच चोरी आपणासी ॥ १५ ॥
आपणासी चोरी सबाह्यअंतरीं । आणि सृष्टीभरी नांदतसे ॥ १६ ॥
नांदतसे अंत नाहीं तो अनंत । जाणतील संत अनुभवी ॥ १७ ॥
अनुभवी जाणे येथींचीये खुणें । येरां वीटवाणें वाटईल[1] ॥ १८ ॥
वाटईल सुख संत सज्जनासी । रामीरामदासीं भेटी जाली ॥ १९ ॥

## १३१. विठ्ठल व राम.

एथें उभा कां श्रीराम । मनमोहन मेघश्याम ॥ १ ॥
काय केले धनुष्यबाण । कर कटावरी ठेवून ॥ २ ॥
काय केली सीताबाई । येथें राहीरखुमाई ॥ ३ ॥
काय केलें वानरदळ । एथें मेळविले गोपाळ ॥४ ॥
काय केली अयोध्यापुरी । एथें वसविली पंढरी ॥ ५ ॥
काय केली शरयूगंगा । एथें आणिली चंद्रभागा ॥ ६ ॥
रामदासीं जैसा भाव । तैसा झाला पंढरिराव ॥ ७ ॥

---

१ वाटेल

# १७ स्फुट प्रकरणं.

——:०:——

## १३२. शक्ति व युक्ति.

प्रतापगिरिचे ठाईं । आदिशक्ती विराजते ।
कामना पुरती तेथें । प्रचीती रोकड्या जनीं ॥

शक्तीनें पावती सुखें । शक्ती नसतां विटंबणा ।
शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगितां दिसे ॥

कोण पुसे अशक्ताला । रोगीसें बरोंडी दिसे ।
कळा नाहीं कांती नाहीं । युक्ती बुद्धी दुरावली ॥

साजिरी शक्ती तों काया । काया मायाची वाढवी ।
शक्ती तों सर्वही सुखें । शक्ती आनंद भोगवी ॥

शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें येत्न होतसे ।
शक्ती युक्ती जये ठाईं । तेथें श्रीमंत धांवती ॥

युक्तीनें चालती सेना । युक्तीनें युक्ती वाढवी ।
संकटीं आपणां रक्षी । रक्षी सेना परोपरी ॥

फितव्यानें बुडती राज्यें । खबरदारी असेचिना
युक्ती ना शक्ती ना बेगीं । लोक राजी असेचिना ॥

असो हें बोलणें जालें । युक्तीविण कामा नये ।
युक्तीला पाहिजे शक्ती । तस्मात् शक्ती प्रमाण हे ॥

मुक्त केल्या देवकोडी । सर्वहि शक्तीच्या बळें ।
समर्थ भवानी माता । समर्था वरु दीधला ॥

---

१ दुकाळलेला. २ फितुरी. ३ त्वरित, वेगान.

रामवरदायिनी माता । दासें धुंडुन काढिली ।
वोळखी पडितां ठाईं । भिन्न भेद असेचिना ॥

उदो उदो तुझा उदो । जाहला सचराचरीं ।
गोंधळु घातला देवीं । ब्रह्माविष्णुमहेश्वरीं ॥

मातेसी काय चोरावें । सर्वही ठाउकें तिला ।
उत्तीर्ण व्हावया नाहीं । तेची ते सचराचरीं ॥

बोलणें चालणें तीचें । देखणें चाखणें सदा ।
आखंड खेळते आंगीं । प्राणमात्रांचिये पाहा ॥

—रामदासांची कविता ४३६.२२–५७.

## १३३. देव व देउळें.

देहेदेवाळयामधें । पाहाणें देव तो बरा ।
देव सांडुनी देवाल्यें । वर्णिती सर्वही कवी ॥

दिसेना लोचनाला रे । घाला रे मन त्यामधें ।
येकला सर्व देवाळीं । गुप्त नाना परी वसे ॥

आनंत कोटि देवाल्यें । त्यामध्यें येकला प्रभु ।
दीपानें दिसेना नाहीं । त्यानें त्यासचि पाहाणें ॥

उजेडे दिसेना नाहीं । आंधारें गुप्त होय ना ।
कदा हातासी लागेना । सर्वथा पूजीतां नये ॥

पूजीतां सर्व देवाल्यें । तेणें तो तृप्त होतसे ।
प्रतक्ष वर्ततें आतां । पाहा रे विवेकी तुम्हीं ॥

देवाल्यें वर्णिती ज्ञाते । ते ज्ञाते नव्हती कदा ।
देव वर्णील तो ज्ञाता । ज्ञानें मोक्षची पावतो ॥

मोडलीं जीर्ण देवाल्यें । तेंचीं लोकांसी मानती ।
भांडती देवळासाठीं । देव चुकोनि राहिला ॥
शरीरमात्र देवाल्यें । जीर्ण सांडुनी जातसे ।
नूतनें रम्य देवाल्यें । त्यामध्यें देव नाटकु ॥
ठकु रे ठकु रे मोठा । ठकीतो जनमानवी ।
मानवी दानवी काया । काया माया पाहा बरी ॥
थोर देवाल्य मुळींचें । ईश्वरु जगदेश्वरु ।
देवदेव्या बहुरूपा । अर्धनारीनटेश्वरु ॥
त्यापुढें तीन देवाल्यें । ब्रह्मा विष्णु महेश्वरु ।
तया अभ्यांतरीं देवो । तो देव सत्य जाणिजे ॥
तोचि जो तो हा जाणा । नानां देवाळयांमधें ।
औतरे[1] देवळामधें । त्यासी औतार बोलिजे ॥
आतां म्यां काये सांगावें । सांगावें त्या परमेश्वरा ।
अखंड अंतरीं ध्यावें । जावें रे निश्चळाकडे ॥

—रामदासांची कविता ४३९. १—२२.

१३४ गुरुशिष्यसंवादात्मक दासबोधाचा सोलीव अर्थ.

धैर्याचें आसन बळकट । आणि इंद्रियें वोढुनी सघट ।
धरे ऊर्ध्वपंथें वाट नीट । अढळपदीं लक्ष लावी ॥ १५ ॥
तैं मार्गाची करूं नव्हाळी । प्रथम घंटा नादाची नवाळी ।
दुसरी किंकिणीची मोवाळी । तिसरी अनुहत कोल्हाळ ॥१७॥
आतां अग्रीं लक्ष लावी । काय दिसेल तें न्याहाळीं ।
चंद्रज्योती प्रकाशली । विभु नांधिला बळकट ॥ १८ ॥

१ अवतार घेतो.

तें सुख अंतरीं घेऊनी । पुढें चाल करी संगमीं ।
तेथें विजु ऐशा कामिनी । चमकताती सुवर्णरंग ॥ १९ ॥
तेंहि जाणोनि मागें सारीं । पुढें सूर्यबिंब अवधारीं ।
ज्वाळा निघती परोपरी । दंडळूं नको कल्पांतीं ॥ २० ॥
अनंतभानु तेज अद्भुत । खादिरांगार ज्वाळा उसळत ।
धारिष्ट तेथें न निभत । दुर्घट विभु तेथींचा ॥ २१ ॥
तेथें हुशारीचें काम । अग्रीं लक्ष घालूनि नेम ।
तीर लावून सुगम । मागें सारी सूर्यातें ॥ २३ ॥
पुढें दिसेल जें नवल । तें पाही हंसमेळ ।
चंद्रकिरण शीतळ । पाहसी तूं मम वत्सा ॥ २४ ॥
तेव्हां मागील दाह शमेल । शीतलाई सर्वांग होईल ।
चंद्राची प्रभा सुढाळ । फडफडीत चांदणें ॥ २५ ॥
तोचि डोळियाचा डोळा पाही । देहातीत वर्म विदेही ।
चिन्मय सुखाची नवाई । भोगी आपुलें कीं गा ॥ २६ ॥
अनुभवाची शीग भरली । आम्रापरी उसळली ।
भूमंडळीं प्रभा पडली । कर्पूरवर्ण नभ झालें ॥ २७ ॥
तया मध्यभागीं सघन । अढळ पद देदीप्यमान ।
उर्वरित ब्रह्म जाण । ध्रुव बैसला अढळतें ॥ २८ ॥
तें तुझें स्वरूप नेटवोटें । जेथें समस्त जाणणें आटे ।
ऐके जालासि धिटें । बळकटपणें बलाढ्य ॥ २९ ॥
ऐसें सुख योगियां लाधलें । तेव्हां देहाचें मरण गेलें ।
सांगणें ऐकणें सरालें । एकत्वपणें एकचि ॥ ३० ॥

— सोंलीव अर्थ १९–३०.

## १३५. श्रीसमर्थकृत पांगूळ

भरत गा खंडामाजी । शरयूतीर ब्रा गांव ।
धर्माचें नगर तेथें । राज्य करी रामराव ।
पांगुळां पाय देतो । देव जानकीचा नाथ ।
जाईन मी तया ठायां । देवा उत्तम तो ठाव ॥ १ ॥

राघवाचा धर्म जागो । (सर्व) अधर्म भागो ।
अज्ञान निरसोनियां । विज्ञानीं लक्ष लागो ॥ ध्रु०॥

मीपणाचे मोडले पाय । ह्मणउनि पांगूळ जालों ।
तूंपणाची कीर्ति देईं । ऐकोनियां शरण आलों ।
मीतूंपण निरसी माझें । भजनभिंतीवरि बैसलों ।
प्रेमफडकें पसरोनियां । कृपादान मागों आलों ॥ २ ॥

जनीं येक तूंचि दाता । म्हणुनि आलों मागावया ।
मागणें निरसे जेणें । ऐसें दे गा रामराया ।
नवविधा दुभतें देईं । भावहलगा बैसावया ॥
ज्ञानकाठीं देईं करीं । वैराग्यबोल पांघराया ॥ ३ ॥

दासीहातीं देवचिसी । तें मी नेघं सर्वथा ।
द्वैतदान नेघें जाण । दोन वेळे आणीतां ।
अपूर्णता देऊं नको । पूर्ण करी निःकामता ।
आपणा ऐसें दान देईं । तूं तरी इच्छेचा दाता ॥ ४ ॥

तुझे कृपेचा कांबळा देईं । मज पांगुळाकारणें ।
माया मोहो हींव वातें । तें हें निवारें जेणें ।
निःकाम भाकर देईं । कामक्षुधा हरे जेणें ।
बोधाचें ताक पाजीं । शब्द खुंटे धालेपणें ॥ ५ ॥

रामदास पांगुळासी । रामें दीधलीयां दान ।
घेणेंचि निरसलें । कैंची मागण्याची खूण ।
देणें घेणें निरसोनीयां । पूर्ण केलें परीपूर्ण ।
दाता ना याचक तेथें । सहजीं सहज संपूर्ण ॥ ६ ॥

—विविधविषय २. ८९.

समाप्त.

## पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें



1 **Academy of Philosophy and Religion**
Poona Branch, Poona (D. G.)

२ अध्यात्मविद्यापीठ, पोस्ट निंबाळ, जिल्हा विजापूर.

३ लक्ष्मण नारायण गोडबोले, बुकसेलर, पुणें २

४ मॅनेजर, नवीन किताबखाना, पुणें २

५ मे. परचुरे पुराणिक मंडळी, बुकसेलर, माधवबाग मुंबई, ४

६ मॅनेजर, बाँबे बुक डेपो, गिरगांव-मुंबई ४